# प्रेषितकन्या फ़ातिमा (रज़ि.)


लेखक

तालिबुल हाशमी

भाषांतर

सय्यद ज़ाकिर अली

## अनुक्रमणिका

*''अल्लाह, असीम कृपावंत व दयावंतच्या नावाने''*

# प्रस्तावना

(सरदार अली अहमद खान साहेब)

हे विश्वाच्या स्वामी व निर्मात्या ईश्वरा! ईश्वराचे प्रेषित आदरणीय मुहम्मद (स.) यांच्यावर तुझी कृपा आणि शांती असो. शांती व कृपा असो त्याच्या संतती आणि सोबत्यांवर !!

हे दयाळू आणि कृपाळू ईश्वरा! तुझी कृपा व शांती असो प्रेषितांचे सरदार मुहम्मद (स.) यांच्यावर या समस्त जगासाठी, दया व कृपा आहेत, मार्गदर्शनाचा तळपता सूर्य आहेत, ईश्वराचे भय दाखविणारे आहेत, अंतिम निवाड्याच्या दिवशी आपल्या नेक अनुयायांची शिफारस करणारे आहेत, ज्यांच्यात सत्यमार्गदर्शनाचे समस्त गुण आहेत, ज्यांची जीवनपद्धती समस्त मानवजातीकरिता आदर्श आहे, ज्यांचे अनुकरण हे ईश्वराची प्रसन्नता आहे.

जगाचा इतिहास या गोष्टीची साक्ष देतो की, आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे सर्वांत जास्त कुलीन आणि सदाचारी परिवारात पाठविण्यात आले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची सदाचारी व सद्वर्तनी संतती आणि त्यांचे सोबती समस्त मानवजातीचे नेते असून प्रेषितांनी जग अस्तित्वात असेपर्यंत मानवजातीसाठी मार्गदर्शनास्तव दोन बाबी सोडून गेले, एक ईशग्रंथ म्हणजेच कुरआन आणि दुसरी बाब म्हणजे त्यांचे परिवारजन. याबाबतीत इस्लामचे प्रगल्भ विद्वान 'इमाम नूदी (रह.)' यांनी म्हटले की, ईश्वराच्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी असे देखील म्हटले आहे की, ईश्वरी ग्रंथ अर्थात कुरआन आणि त्यांचे परिवारजन हे कधीच विभक्त होणार नाहीत. अर्थातच प्रेषितांचे परिवारजन कुरआनाचे दिव्य मार्गदर्शन कधीच सोडणार नाहीत. इथपावेतो की, त्यांची भेट कौसरच्या हौदावर प्रेषितांशी होईल.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या चार मुली माता खदीजा (रज़ि.) यांच्या पोटी जन्मल्या, त्यांची नावे अशी आहेत.

१) माननीय झैनब (रज़ि.)

२) माननीय रूक़ैया (रज़ि.)

३) माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.) आणि

४) माननीय फातिमा (रज़ि.)

प्रेषित कन्यांपैकी सर्वांत थोरली कन्या ही माननीय झैनब (रज़ि.) असून प्रेषित मुहम्मद (स.) यांचे वय तीस वर्षे असताना जन्मास आली. तिने मुहम्मद (स.) यांचा प्रेषितत्वाचा काळ पाहिला आणि मदीना स्थलांतराच्या प्रसंगी तिनेसुद्धा मक्का त्यागून

मदीनेस स्थलांतर केले. अरबी भाषेत स्थलांतरालाच 'हिजरत' असे म्हणतात. तिचा विवाह अबुल आस (रज़ि.) यांच्याशी झाला. मदीना स्थलांतर केल्यानंतर आठव्या वर्षी झैनब (रज़ि.) मृत्यू पावली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांची द्वितीय कन्या माननीय रूकैया (रज़ि.) हीसुद्धा मक्का शहरातच जन्मली. तिच्या जन्माच्या वेळी प्रेषितांचे वय तेहतीस वर्षांचे होते. रूकैया (रज़ि.) चे लग्न माननीय उस्मान (रज़ि.) यांच्याशी झाले होते. हिला दोनदा 'हिजरत' करण्याचा पुण्ययोग प्राप्त झाला, पहिल्यांदा ॲबीसीनियाकडे आणि दुसऱ्यांदा मदीना शहराकडे, प्रेषितांची ही कन्या खूप सुंदर होती. प्रेषित मुहम्मद (स.) 'बदर'ची रणभूमी गाजवीत असतानाच ती मृत्यू पावली. तिच्या निधनानंतर प्रेषितांची धाकटी अर्थात क्रमांक तीनची कन्या माननीय उस्मान ((रज़ि.) यांच्या विवाहबंधनात आली, अर्थात उम्मे कुलसूम (रज़ि.) ने विवाहानंतर सहा वर्षे वैवाहिक जीवन व्यतीत केले आणि तिचे देखील निधन झाले. तिला मूलबाळ नव्हते. तिच्या जनाज्याची नमाज स्वत: प्रेषितांनी अदा केली. प्रेषितांची चौथी कन्या माननीय फामिता (रज़ि.) ही प्रेषितांना प्रेषितत्व मिळण्याच्या एक वर्षापूर्वी 'जमादिल आखिर' महिन्याच्या वीस तारखेस शुक्रवारच्या रोजी जन्मली. प्रेषितांनी तिचे नाव 'फातिमा' असे ठेवले.

फातिमा (रज़ि.) च्या जन्मापूर्वीच आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपली भार्या खदीजा (रज़ि.) यांना म्हटले होते की, मला जिब्रील फरिश्त्याने खबर दिली की, तुमच्या घरी कन्यारत्न होईल आणि तिचे नाव 'फातिमा' असे ठेवावे. या नावाचा अर्थ 'पवित्र' असा आहे. प्रेषितांच्या आणखीन एका वचनाच्या आधारे हे देखील स्पष्ट होते की, या कन्येचे नाव फातिमा ठेवण्याचा असा हेतु होता की, ईश्वराने तिला व तिच्या संततीस अंतिम निवाड्याच्या दिवशी नरकाग्नीपासून मुक्ती प्रदान केली.

मानवजातीकरिता पूर्णत: दया आणि कृपा असलेल्या प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मानवसमाजाच्या उभारणीचा पाया रोवला, मानवजातीस सदाचार आणि सद्वर्तनाच्या अलंकारांनी अलंकृत केले, यामुळे मानवजातीस सद्वर्तन आणि सत्यमार्गाचा प्रचंड स्त्रोत प्राप्त झाला. मानवजगातासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांची महिम वारसां असून याचे प्रत्यक्ष वारसदार प्रेषितांचे सोबती, प्रेषितभार्या आणि प्रेषितांची संतती होय. या पावन समाजाचा एक कांतीमय अध्याय हा फ़ातिमा (रज़ि.) यांचे जीवनचरित्र होय. प्रेषितकन्या फ़ातिमा (रज़ि.) यांनी आपल्या अप्रतिम सदाचार आणि शालीनतेने हे सिद्ध करून दाखविले की, संततीच्या नीतीमत्ता, उच्च विचारसरणी, जबरदस्त इच्छाशक्ती आणि पात्रता घडविण्यात आईचे योगदान किती महान असते. मुस्लिम स्त्रियां आणि इतर सर्वच शालीनताप्रिय स्त्रियांकरिता फ़ातिमा (रज़ि.) यांचे जीवनचरित्र हे प्रेषित मुहम्मदांच्या आचरण पद्धतीचे अत्युत्तम उदाहरण असून प्रत्येक काळ आणि प्रत्येक ठिकाणच्या मानवासाठी एक आदर्श होय. या अशा प्रखर कांतीमय पाऊलखुणा आहेत, ज्या कधीच मिटणार नाहीत.

फ़ातिमा (रज़ि.) या आपले पिता आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आज्ञाधारक आणि त्यांच्या मर्जीची जाण राखणाऱ्या कन्या होत्या. त्यांनी आपल्या वडिलांसमोर कधीच कोणत्याही गोष्टीची मागणी केली नाही. त्या प्रेषितांच्या कन्या तर होत्याच शिवाय त्यांचा स्वभाव अगदी प्रेषितांसारखाच होता. सवय, आचरण, चालणे, बोलणे, हसणे वगैरे सर्व काही पित्याप्रमाणेच. फ़ातिमा (रज़ि.) या खूपच दानशूर होत्या. प्रत्येक याचकासाठी त्यांचा हात नेहमी वरच होता. त्यांच्या दारी आलेला कोणताही याचक कधीच रिकाम्या हाती परतला नाही. त्या लहान, मोठे, अबालवृद्ध, सर्वांचाच मनापासून आदर करीत, सर्वांशी मनमिळाऊ स्वभावाने वागत.

फ़ातिमा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या खूपच लाडक्या होत्या. त्या जेव्हा पित्यासमोर जात, तेव्हा प्रेषित आपल्या लाडक्या कन्येच्या स्वागतासाठी ताडकन उठून उभे राहत आणि हात धरून मोठ्या प्रेमाने आपल्या जवळ बसवित. आपल्या पित्याच्या अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या देखरेखीत इस्लामी आचरणाचे धडे गिरविल्यामुळे त्यांचा रुतबा खूप मोठा, त्यांचे स्थानही खूप महान आणि आदरयुक्त होय. जीवनाचे सर्व नियम त्यांनी आपल्या पित्याच्याच प्रेमळ सान्निध्यात आत्मसात करून त्यावर काटेकोरपणे आचरणसुद्धा केले. अर्थातच याच नियमांनुसार जीवन व्यतीत केले. ईशपरायणता, पावित्र्य, ईश्वरावर श्रद्धा आणि त्याच्या मर्जीच्या पालनामुळे त्या इस्लामी क्षितिजावरील मार्गदर्शक नक्षत्रच होत्या.

त्यांच्या विवाहाचा किस्सा देखील खूप मजेदार आहे. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या अनुयायांना भाषण देताना म्हटले की, मला ईश्वराने आदेश दिला आहे की, "मी आपली कन्या फ़ातिमाचा विवाह अली (रज़ि.) यांच्याशी करावा. म्हणून तुम्ही सर्वांनी साक्षी असावे की, चार तोळे चांदीच्या मेहेर (वधू भेट) च्या रकमेत आपल्या कन्येचा विवाह अली (रज़ि.) यांच्याशी ते तयार असतील तर करीत आहे. याप्रसंगी माननीय अली (रज़ि.) हजर नव्हते. एवढ्यात माननीय अली (रज़ि.) प्रेषितांच्या सभेत हजर झाले. त्यांच्यासमोर हा प्रस्ताव येताच त्यांनी होकार दिला आणि याच ठिकाणी अत्यंत साध्या पद्धतीने हा विवाहसोहळा पार पडला.

यानंतर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ईश्वरदरबारी प्रार्थना केली की, "हे ईश्वरा! नवविहाहित दांपत्याचे दांपत्यिक जीवन सुखाचे जावो आणि त्यांच्या वंशात सत्यनिष्ठ लोक जन्मास येवो, तसेच पती-पत्नीच्या जीवनात बरकत येवो आणि त्यांची नेक संतती वा वंश समस्त जगात फैलावी."

माननीय अली (रज़ि.) यांनी आपली पत्नी फ़ातिमा (रज़ि.) हयात असेपर्यंत दुसरा विवाह केला नाही.

माननीय अली (रज़ि.) यांचा जेव्हा फ़ातिमा (रज़ि.) यांशी विवाह झाला, तेव्हा त्यांची परिस्थिती बेताचीच होती. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या मुलीच्या

दांपत्यिक जीवनातील गरिबीची परिस्थिती पाहून दु:खी होत. त्यांचे डोळे पाणावत असत. मात्र अत्यंत संयमी व धैर्यशील कन्या फ़ातिमा (रज़ि.) यांना पाहून समाधानी होत. तिची ईश्वराप्रती श्रद्धा व कृतज्ञता पाहून प्रेषितांना हायसे वाटत. एकदा माननीय अली (रज़ि.) घरी आले आणि पत्नीला काही तरी खाण्यासाठी मागितले. फ़ातिमाने (रज़ि.) म्हटले की, सलग तीन दिवसांपासून घरात अन्नाचा कणसुद्धा नाही. माननीय अली (रज़ि.) म्हणाले, "तू मला सांगितले देखील नाहीस!" यावर फ़ातिमा (रज़ि.) म्हणाल्या, "हे पतीराज! विवाहानंतर पतीघरी पाठविताना वडिलांनी अर्थात प्रेषितांनी मला ही शिकवण दिली होती की, मी तुमच्यासमोर असे काही मागू नये, ज्यामुळे तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल!"

फ़ातिमा (रज़ि.) घरची सगळी कामे स्वत:च करीत. जात्याने पीठ दळून-दळून हाताला फोड येत. घराची सफाई करून आणि चुलीत फुंकर घालून कपडे मळकट होत. मात्र त्या कष्ट करण्यास मुळीच मागे सरत नसत. कष्ट करणे जणू त्यांच्या अंगवळणीच होते. घराची सर्व कामे उरकून त्या ईश-स्मरण आणि नमाज अदा करीत असत.

एकदा आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी कन्या फ़ातिमा (रज़ि.) यांना विचारले,

"मुस्लिम स्त्रीचे गुणधर्म कोणते?" त्यांनी उत्तर दिले,

"ईश्वर आणि त्याच्या प्रेषितांची अज्ञापालन करणे, आपल्या मुलांबाळांवर प्रेम करून त्यांना योग्य प्रशिक्षण देणे, आपल्या नजरा खाली ठेवणे, आपल्या सौंदर्याचे परपुरुषांसमोर प्रदर्शन न करणे, परपुरुषांना न न्याहाळणे, हे मुस्लिम स्त्रीचे गुणधर्म होत."

आपल्या लाडक्या व स्वाभिमानी कन्येच्या तोंडून हे उत्तर ऐकून प्रेषितांना खूप आनंद झाला. त्यांना आपल्या या लाडक्या कन्येच्या ईशपरायणतेवर खूप आनंद व समाधान होत. प्रेषितांनी अनेक प्रसंगी तिच्याविषयी हे गौरोवोद्गार काढले की, "परलोकी जीवनात फ़ातिमा (रज़ि.) ही स्वर्गातील स्त्रियांची सरदार असेल."

ईश्वरदरबारी प्रार्थना आहे की, आपल्या आई, बहिणी आणि मुलींना ईश्वर फ़ातिमा (रज़ि.) च्या जीवन मार्गावर चालण्याची सद्‌बुद्धी प्रदान करो.

तथास्तु

आपला

सरदार अली खान

२८ एप्रिल १९८५

# लेखकाचे मनोगत

ईश्वराची अपार कृपा आहे की, त्याने मला आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या लाडक्या अर्थात माननीय फ़ातिमा (रज़ि.) यांच्या जीवनाचा संक्षिप्त इतिहास लिहिण्याची संधी प्रदान केली. या पुस्तकात मी फ़ातिमा (रज़ि.) यांचे जीवनचरित्र लिहिताना त्यांच्या संबंधितांच्या जीवनचरित्रावरही प्रकाशझोत टाकण्याचा प्रयत्न केला. अर्थातच माननीय फ़ातिमा (रज़ि.) यांची माता माननीय खदीजा (रज़ि.), माननीय झैनब (रज़ि.) बहीण, रूकैया (रज़ि.) बहीण, उम्मे कुलसूम (रज़ि.) बहीण, फ़ातिमा बिन्ते असद (रज़ि.) सासू, माननीय अली (रज़ि.) पती, माननीय हसन (रज़ि.) व हुसैन (रज़ि.) मुले, झैनब बिन्ते अली (रज़ि.) कन्या आणि फ़िज़ा (रज़ि.) सेविका यांच्या जीवनाचासुद्धा थोडक्यात उहापोह केला. मात्र माननीय फ़ातिमा (रज़ि.) यांच्या जीवनचरित्राचा इतिहास प्रामुख्याने उल्लेखित करण्यात आला.

जगातील प्रत्येक सदाचारी स्त्रीकरिता फ़ातिमा (रज़ि.) यांच्या जीवनचरित्राचा संपूर्ण अध्याय म्हणजेच लहानपण, तारुण्य, विवाह, सासर, पती, परिवार, पूजा व भक्ती, संयम, स्वाभिमान, मुलांचे संगोपान व प्रशिक्षण, दान-धर्म, समाज सेवा, नातलगांचे अधिकार पूर्ण करणे वगैरे अनुकरणीय होय.

फ़ातिमांचे (रज़ि.) जीवनचरित्र हे समस्त स्त्रियांच्या कल्याणासाठी जीवनमार्गातील पाऊलखुणाच होय. या पाऊलखुणांवर जीवनाची वाटचाल केल्यास निश्चितच जीवनाचे अंतिम लक्ष्य प्राप्त होईल. ऐहिक आणि पारलौकिक जीवनात नक्कीच यश प्राप्त होईल.

ईश्वर सर्वांना सद्बुद्धी देवो !

आपला

तालिबुल हाशमी

७ जुलै १९८५

## दोन शब्द माननीय फ़ातिमा (रज़ि.) यांना अर्पण

ईश्वरी मर्जीचे फळ

मातांकरिता अनुकरणीय

याचकांसाठी तळमळणारी

दीन-दलितांसाठी धडपडणारी

गरजवंताच्या गरजपूर्तीसाठी

एका 'ज्यू' ला चादर विकणारी

सर्वांसाठीच आदर्श असणारी

पतीला नेहमी संतुष्ट ठेवणारी

संयम व धैर्याच्या वातावरणात वाढलेली

जात्याने दळण दळणारी आणि मुखावर ईश्वराचे स्मरण असणारी

फ़ातिमा (रज़ि.) हिला

शतश: सलाम व शांती !!!

## प्रकरण पहिले

# फ़ातिमा (रज़ि.) व त्यांच्या उपाधी

फ़ातिमा (रज़ि.) हे नाव म्हणजेच लोकांना नरकाग्नीपासून रोखणारी, असा या नावाचा अरबी भाषाशास्त्रात अर्थ होतो. लोकांना सदाचाराची शिकवण देऊन दुराचारापासून रोखणे, यालाच नरकाग्नीत जाण्यापासून रोखणे, असा इस्लामी परिभाषेत अर्थ आहे. फ़ातिमा (रज़ि.) यांची याशिवाय आणखीनही काही टोपण नावे आहेत, ती खालीलप्रमाणे.

१) ज़हरा - म्हणजे ताज्या व टवटवीत फुलासारखी पवित्र, सुंदर.

२) बतुल - ईश्वराची सच्ची दासी, ईश्वराच्या मार्गात सर्वस्व अर्पण करणारी.

३) सय्यदतुन निसा उल आलमीन - समस्त जगातील स्त्रियांची सरदार.

४) सय्यदतुन निसा अहलल जन्ना - समस्त स्वर्गीय स्त्रियांची सरदार.

५) ज़ाकियह - अत्यंत उच्च व पवित्र स्वभाव व आचरण असणारी.

६) राज़ियह - ईश्वर आणि प्रेषिताच्या (स.) मर्जीवर समाधानी असणारी.

७) बदीयतुर्रसूल - प्रेषितांच्या (स.) काळजाचा तुकडा (लाडकी कन्या).

८) अल बदीयतुन नबवीयह - प्रेषितांची (स.) अत्यंत लाडकी.

९) उम्मे अबीहा - करीमतुत तरफ़ैन पिता आणि माता दोहोंतर्फे उच्च कुलीन.

१०) ताहिरह - पवित्र आचरण असलेली.

११) मुतदहिरह - पवित्र करणारी

१२) मरदीयह - ईश्वर आणि प्रेषिताच्या (स.) मर्जीवर जीवन व्यतीत करणारी.

१३) उज़रा - मुलगी.

## प्रकरण दुसरे

# सय्यदा फ़ातिमा (रज़ि.) यांचे पितावर्य

माननीय फ़ातिमा (रज़ि.) यांचे पितावर्य हे प्रेषित मुहम्मद (स.) होय. अर्थातच ही अतिमहान स्त्री. प्रेषितांचे सरदार, जगासाठी दया आणि कृपा असलेल्या प्रेषित मुहम्मद (स.) यांची लाडकी कन्या. यावर जास्त काही लिहिण्याची गरज नाही.

## फ़ातिमा (रज़ि.) यांची माता माननीय ख़दीजतुल कुब्रा (रज़ि.)

फ़ातिमा (रज़ि.) यांच्या माता या प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पहिल्या भार्या माननीय ख़दीजतुल कुब्रा (रज़ि.) होत. इस्लामी इतिहासात ही स्त्री अत्यंत महत्त्वाच्या व सुप्रसिद्धीच्या स्थानावर विराजमान आहे. हिचे नाव ख़दीजा आणि उपाधी ताहिरा (पवित्र स्त्री) होय. हिच्या मातेचे नावसुद्धा 'फ़ातिमा' व पित्याचे नाव ख़विलद असे होते. हिचे माता व पिता दोघेही कुरैश कबिल्याचेच. हिच्या पित्याची वंशावळी खालीलप्रमाणे आहे.

ख़विलद (ख़दीजाचे पिता)
असद (ख़विलदचे पिता)
अब्दुल उज़्ज़ा (असदचे पिता)
कुस्सी (अब्दुल उज़्ज़ाचे पिता)

माननीय खदीज़ा (रज़ि.) यांचे पिता ख़विलद बिन असद हे मक्का शहरातील एक प्रतिष्ठित व प्रामाणिक व्यापारी होते. व्यवसायात पारदर्शकता व प्रामाणिकतेमुळे मक्का शहरातील सर्वच त्यांचा नितांत आदर करीत. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या जन्माच्या पंधरा वर्षांपूर्वी ख़दीजा (रज़ि.) यांचा जन्म झाला. ख़दीजा (रज़ि.) या अगदी लहानपणापासूनच गंभीर आणि संयमी व पित्याप्रमाणेच खूप प्रामाणिक होत्या. तारूण्याच्या उबरठ्यावर पाय ठेवताच त्यांचे लग्न 'अबुल हाला' यांच्याशी झाले. त्यांच्यापासून ख़दीजा (रज़ि.) यांना 'हाला', 'हिंद' आणि 'ताहिर' ही तीन मुले झाली. 'अबुल हाला' यांचा एक मुलगा 'हारिस (रज़ि.)' यांनी प्रेषितांच्या काळात इस्लामचा स्वीकार केला. एकदा प्रेषित मुहम्मद (स.) लोकांना सत्याचा संदेश देत होते. यावर विरोधकांनी प्रेषितांवर अचानक प्राणघातक हल्ला केला. इतक्यात 'हाला' आणि 'हारिस (रज़ि.)' प्रेषितांच्या मदतीस धावून आले. विरोधकांनी याच क्षणी 'हारिस (रज़ि.)' यांच्यावर तलवारींनी हल्ला करून त्यांना शहीद केले. म्हणूनच प्रेषितांसाठी प्राणार्पण करणाऱ्यांपैकी पहिले सोबती म्हणून हारिस (रज़ि.) यांची इतिहासात नोंद झाली. तिसऱ्या

क्रमांकाचे पुत्र ताहिर (रज़ि.) हेसुद्धा प्रेषितांच्या सोबत्यांपैकी असून प्रेषितांनी त्यांना 'येमेन'च्या राज्यपालपदी नेमले होते. प्रेषितांच्या नंतर माननीय अबू बकर (रज़ि.) यांच्या हाती इस्लामी शासनाची धुरा आली आणि इस्लामद्रोह्यांविरुद्ध युद्ध करण्यासाठी पाठविलेल्या लष्कराच्या सरसेनापदी ताहिर (रज़ि.) ची नेमणूक केली. ताहिर (रज़ि.) यांनी शत्रुंवर दणदणीत विजय मिळविला. 'हिंद' (रज़ि.) यांचे संगोपान स्वत: प्रेषितांनीच केल्याची इतिहासात नोंद आढळते. हिंद (रज़ि.) हे अत्यत उत्कृष्ट वक्ते होते. वक्तृत्वकलेत त्यांना कमालीचे प्रभुत्व होते. 'जमल'च्या युद्धात माननीय अली (रज़ि.) यांच्याकडून लढताना ३६ हिजरी सनात त्यांना वीरमरण आले.

अबुल हाला यांचे निधन तारुण्यातच झाले आणि ख़दीजा (रज़ि.) विधवा झाल्या. यानंतर ख़दीजा (रज़ि.) यांचा दुसरा विवाह 'अंतीक बिन आबिद' यांच्याशी झाला. या पतीकडून हिंदा नावाची एक मुलगी ख़दीजा (रज़ि.) यांच्या पोटी जन्मली. हिंदा (रज़ि.) चेही पालनपोषण प्रेषितांनीच केले.

माता ख़दीजा (रज़ि.) यांचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी लग्न होण्यापूर्वीच त्यांचे पिता 'ख़विलद बिन असद' हे 'फुज्जार'च्या युद्धात ठार झाले होते. पित्याच्या निधनानंतर पित्याची संपत्ती व व्यापार ख़दीजा (रज़ि.) यांनी सांभाळला. त्यांच्या या व्यवसायात बरेच तज्ञ कर्मचारी काम करीत होते. तरीसुद्धा ख़दीजा (रज़ि.) यांची इच्छा होती की, येमेन आणि सीरीयासारख्या देशात माल विण्याकरिता अत्यंत प्रामाणिक आणि कुशल माणूस मिळावा.

हा असा काळ होता, ज्यामध्ये मुहम्मद (स.) नावाचा तरुण मक्का शहरात अत्यंत पवित्र, गंभीर आणि प्रामाणिक आचरणाचा असल्याची चर्चा होती. लोक मुहम्मद (स.) यांना अमीन व सादिक म्हणजेच अनामतदार आणि सच्चा या नावाने संबोधित होते. अर्थातच मुहम्मद (स.) यांच्या प्रामाणिकतेचा सर्वत्र डंका वाजत होता. यामुळे मक्कावासी या तरुणाचा नितांत आदर करीत असत. मुहम्मद (स.) यांच्या प्रामाणिकतेची चर्चा ख़दीजा (रज़ि.) यांच्या कानावर पोचली नसेल तर नवलच. ख़दीजा (रज़ि.) यांनी तांबडतोब मुहम्मद (स.) यांच्यासमोर प्रस्ताव ठेवला की आपला व्यापारी माल सीरीयाला नेऊन विकावा. मुहम्मद (स.) यांनीही हा प्रस्ताव स्वीकारला. मुहम्मद (स.) यांनी ख़दीजा (रज़ि.) यांचे व्यापारी सामान घेऊन सीरीयाकडे कूच केले. त्यांच्यासोबत सहाय्यक म्हणून ख़दीजा (रज़ि.) यांनी 'मैसरा' यास पाठविले. मुहम्मद (स.) यांनी संपूर्ण सामान विकले आणि मागील काळात होणाऱ्या नफ्यापेक्षा दोनपटीने जास्त नफा मिळाला. परतीच्या प्रवासात मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांशी इतके चांगले

वर्तन केले की, सर्वच सहकारी त्यांचे जीवलग मित्र झाले. मुहम्मद (स.) यांचा व्यापारी काफिला मक्का शहरी परतल्यावर 'मैसरा' याने ख़दीजा (रज़ि.) यांच्यासमोर मुहम्मद (स.) यांच्या प्रामाणिकता आणि सद्वर्तनाची प्रशंसा केली. याबरोबरच व्यापारात दीनपटीने नफा मिळविण्यासाठी मुहम्मद (स.) यांचा प्रामाणिकपणा कसा सहाय्यभूत ठरला, याचा सविस्तर वृत्तांत सांगितला. मैसराच्या तोंडून मुहम्मद (स.) यांच्या प्रामाणिकपणा, व्यापारकुशलता आणि सद्व्यवहाराची प्रशंसा ऐकून ख़दीजा (रज़ि.) यांना खूप आनंद झाला. नकळत तिचे हृदय मुहम्मद (स.) यांच्याकडे आकर्षित झाले. त्यांच्या मनात मुहम्मद (स.) यांच्याविषयी अपार आदर निर्माण झाला.

मागच्या काळात ख़दीजा (रज़ि.) यांना एक स्वप्न पाहिले होते की, आकाशातून एक चंद्र त्यांच्या पदरात येऊन पडला आणि या चंद्रप्रकाशामुळे संपूर्ण विश्व प्रकाशमय झाले. या स्वप्नाचा अर्थ त्यांनी एका ख्रिस्ती विद्वानास विचारला. यावर तो ख्रिस्ती विद्वान आश्चर्य आणि आनंदाने भारावून गेला. तो थरथरत्या आवाजात ख़दीजा (रज़ि.) यांना म्हणाला,

''अरबजनांतील हे प्रामाणिक व शालीन भगिनी! तू अत्यंत भाग्यवान आहेस. तुला शुभेच्छा असो की प्रेषित इब्राहीम (अ.) यांनी ज्या प्रेषितांची प्रार्थना केली होती, ती प्रार्थना पूर्ण झाली आणि प्रेषित येशु मसीह (अ.) यांनी ज्या प्रेषितांची भविष्यवाणी केली होती, त्या प्रेषितांचे आगमन झालेले आहे. या प्रेषितांशी तुझा विवाह होणार.'' ख़दीजा (रज़ि.) यांना हे स्वप्न आठवले आणि त्या अत्याधिक आनंदाने भारावून गेल्या. त्यांनी आपली दासी 'नुफिसा' करवी अत्यंत शालीन व प्रामाणिक तरूण मुहम्मद (स.) यांना लग्नाचा प्रस्ताव धाडला. हे मुहम्मद (स.) यांनी हा प्रस्ताव स्वीकार केला. पाचशे दिरहम राशीच्या मेहेर (वधूभेट) रकमेवर हा विवाह अत्यंत साध्या पद्धतीने पार पडला. याप्रसंगी मुहम्मद (स.) हे अवघे पंचवीशीतील तरूण होते. तर माता ख़दीजा (रज़ि.) चाळीस वर्षांच्या होत्या.

लग्न होऊन काही काळ उलटत गेला. दोघांचे दांपत्यिक जीवन अगदी सुखा-समाधानात व्यतीत होत होते. मात्र आता मुहम्मद (स.) यांची दिनचर्या बदलत गेली. त्यांचे लक्ष संसारात रमत नव्हते. ते सत्यशोधार्थ कित्येक दिवस घराबाहेर घालवित होते. हिरा नावाच्या गुहेत ते आपला एकांत व्यतीत करीत, ईश्वराची उपासना करीत. अशाच परिस्थितीत एक विलक्षण प्रसंग त्यांच्या जीवनात आला. 'हिरा' गुहेत ईश्वराची उपासना करीत असताना ईश्वरी आदेशाने त्यांच्यासमोर जिब्रील फरिश्ता प्रकटला, नि म्हणाला,

“इक्रा ! (वदा!)” मुहम्मद (स.) यांनी आपली दृष्टी वर उचलली. समोर अत्यंत तेजस्वी स्वरुपाचा जिब्रील फरिश्ता उभा आहे. जिब्रीलने त्यांना छातीशी कवटाळले नि म्हणाला, “इक्रा ! (वदा !)”

मुहम्मद (स.) म्हणाले, “मला वदता येणार नाही.”

दोनदा असेच घडले, परत तिसऱ्यांदा जिब्रील म्हणाला, ‘इक्रा बिस्मि रब्बि कल्लजी खलक़ ख़लकल इन्साना मिन अलक इक्र व रब्बुकल अक्रमल लजी अल्लमा बिल कलम अल्लमल इनसाना मालम यअलम.”

(अर्थात : वदा आपल्या पालनकर्त्याच्या नावाने, ज्याने सर्वांची निर्मिती केली, ज्याने मानवाची निर्मिती पाण्यासम पदार्थापासून केली, वदा की तुमचा पालनकर्ता खूप कृपाळू आहे ज्याने लेखणीने त्या मानवास ज्ञान शिकविले, जो काही जाणत नव्हता.”)

या विलक्षण आणि अत्यंत आश्चर्यकारक प्रसंगामुळे मुहम्मद (स.) यांची प्रकृती खूप प्रभावित झाली. त्यांच्या सर्वांगास दरदरून घाम फुटला. ते अशा विरुद्ध अवस्थेत घरी आले. ख़दीजा (रज़ि.) यांना म्हणाले,

“मला पांघरूण घालून झोपव.”

ख़दीजा (रज़ि.) यांनासुद्धा आश्चर्य वाटले. मुहम्मद (स.) त्यांनी पांघरूण घातले, मोठ्या प्रेमाने कुरवळीत विचारले, “तुम्ही कुठे होता?”

यावर प्रेषितांनी सविस्तर हकीकत सांगितली. ख़दीजा (रज़ि.) सुद्धा आपल्या पतीची अवस्था पाहून कासावीस झाल्या होत्या. प्रत्येक मुहम्मद (स.) खूप घाबरलेले होते. ते बडबडत होते,

“असे वाटते की माझा जीव जाईल !” मात्र माता ख़दीजा (रज़ि.) यांनी त्यांना खूप धीर दिला, सांत्वन केले, म्हणू लागल्या,

“तुम्ही नेहमी सत्य बोलता, गरिबांची मदत करता, लोकांचा पाहुणाचार करता, दीन-दलितांची मदत करता, दुःखी कष्टीजनांची सढळ हाताने मदत करता. अशा नेक, सज्जन व प्रामाणिकास ईश्वर कसे बरे वाया जाऊ देईल !!!”

ख़दीजा (रज़ि.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना सावरले. प्रेषित मुहम्मद (स.) यांना पत्नीच्या सांत्वनामुळे कमालीचा हुरूप आला, धीर मिळाला. यानंतर ख़दीजा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांना घेऊन आपला वयोवृद्ध चुलत बंधु ‘वरका बिन मौफिल’कडे आल्या. ‘वरक़ा बिन नौफ़िल’ याने ईसाई धर्म स्वीकारलेला होता. शिवाय

तो ईसाई धर्माचा विद्वान व गाढा अभ्यासक होता. त्याने अरबसमाजातील मूर्तीपूजेचा धर्म त्यागून एकेश्वरवाद स्वीकारला होता. माता ख़दीज़ा (रज़ि.) यांनी आपल्या पतीवर ओढावलेला प्रसंग त्याच्यासमोर सविस्तर वर्णन केला. हे सविस्तर वर्णन ऐकताच वरक़ा बिन नौफिलच्या आश्चर्यास पारावर उरला नाही, तो आशाळभूत नजरेने प्रेषित मुहम्मद (स.) यांना न्याहाळू लागला, म्हणाला,

"मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरलेला हा तोच दैवी संदेश आहे, जो प्रेषित मूसा (अ.) यांच्यावर अवतरलेला होता. कदाचित मी त्या काळापर्यंत जगलो असतो, जेव्हा तुमचे लोक तुम्हास शहराबाहेर काढतील."

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आश्चर्याने विचारले, "मला शहराबाहेर घालविण्यात येईल?"

"होय !" वरक़ा गंभीरपणे म्हणाला, "जे सत्य तुमच्यावर अवतरित झाले आणि ज्यावर हे सत्य अवतरित होते, त्यास लोकांचा प्रखर विरोधच पत्करावा लागतो आणि परिणामी त्यास मायभूमीचा त्याग करावाच लागतो. हे ईश्वराच्या प्रेषिता! मी जर त्या काळापर्यंत जगलो तर निश्चितच तुमची मदत करीन !"

यानंतर काही काळातच वरक़ाने या ईहलोकाचा त्याग केला. माता ख़दीजा (रज़ि.) यांना आता पूर्ण विश्वास झाला होता की, मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व प्राप्त झाले. त्यांनी सर्वप्रथम प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर श्रद्धा ठेवली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी झालेल्या विवाहानंतर त्या पंचवीस वर्षे जगल्या. या काळात त्यांनी प्रेषितांची पूर्णपणे साथ दिली. त्यांच्याबरोबर प्रत्येक प्रकारचे दुःख झेलले, प्रत्येक संकटाचा मुकाबला करताना मोठ्या हिरिरीने प्रेषितांच्या खांद्याला खांदा दिला. प्रेषितांसाठी आपले सर्वस्व पणाला लावले. पावलोपावली त्यांची साथ दिली, सत्य स्थापनेच्या कार्यात माता ख़दीजा (रज़ि.) यांचे योगदान खरोखरच खूप महान आहे. त्यांचे हे योगदान स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) यांनी गौरविले. माता ख़दीजा (रज़ि.) यांची आठवण येताच प्रेषितांना गहिवरून येत असे.

ख़दीजा (रज़ि.) यांनी इस्लाम स्वीकारल्यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांचे चुलत बंधु माननीय अली (रज़ि.) यांनीदेखील इस्लाम स्वीकारला. माननीय अबू बकर (रज़ि.), झैद बिन हारिसा (रज़ि.) वगैरेंनीही याच वेळी अर्थात प्रारंभीच्याच काळात इस्लाम स्वीकारला. यानंतर इतरांनी इस्लामचा स्वीकार केला. माता ख़दीजा (रज़ि.) यांनी आपल्या नातलग आणि हितैषींचा विरोध झुगारून प्रेषितांची तन मन धनाने साथ दिली.

त्यांच्या सत्याच्या प्रचार-प्रसारकार्यात आपली पूर्ण संपत्ती अर्पण केली, इस्लामकरिता उपासमारी आणि दारिद्र्याचे जीवन कंठिले. ईशप्रसन्नतेसाठी आणि प्रेषितांच्या इच्छेची पूर्तता करण्यासाठी कित्येक अनाथ आणि पददलितांवर आपला पैसा खर्च केला.

एकीकडे मक्का शहरातील इस्लामचे प्रखर विरोधक प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायांना छळण्यात कोणतीच कसर ठेवीत नसत. जेव्हा प्रेषित विरोधकांच्या टर आणि मस्करीने दु:खी कष्टी होत असत तेव्हा त्यांना ख़दीजा (रज़ि.) धीर देत, त्यांचे सांत्वन करीत, त्यांना म्हणत,

"हे प्रेषित! बरे असा कोणता प्रेषित होऊन गेला असेल, ज्याची विरोधकांनी मस्करी केली नसेल.?"

ख़दीजा (रज़ि.) यांच्या या सांत्वनाने व मायेने ओतप्रोत भरलेल्या शब्दांमुळे प्रेषित मुहम्मद (स.) यांना नवी स्फूर्ती मिळत आणि ते परत नव्या आत्मविश्वासाने व मोठ्या जोमाने कामाला लागत. शिवाय प्रेषितांची ही प्रिय भार्या ख़दीजा (रज़ि.) केवळ तोंडी सांत्वन करणारी नव्हती, तर तिने प्रेषितांच्या या सत्यांदोलनासाठी आपल्या सर्वस्वाचे बलिदान दिले. तिने प्रेषितांची या अत्यंत वाईट दिवसांत सर्वोपरी मदत केली. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) नेहमी ख़दीजा (रज़ि.) यांच्या आठवणीने गहिवरून जात आणि म्हणत,

"इस्लामद्रोह्यांकडून मला जेव्हा सत्यविरोधी गोष्टी ऐकावयास मिळत आणि मी यामुळे जेव्हा दु:खी-कष्टी होतो, तेव्हा मी ते ख़दीजास सांगत असे. तेव्हा ती माझे सांत्वन करी. ती अशा रितीने माझी समजून घालत होती की माझ्यात परत नव्याने स्फूर्ती चढत असे आणि मनाला खूप शांती मिळे, विरोधकांनी माझ्या मनाला दिलेल्या प्रत्येक जखमेवर ती थंड फुंकर घालीत असे आणि माझे दु:खी-कष्टी हृदय हलके होई."

प्रेषितांची भार्या ख़दीजा (रज़ि.) यांचे इस्लामी आंदोलनावर खूप उपकार आहेत. प्रेषितांवरील खरे प्रेम आणि गाढ श्रद्धा, त्याग आणि आपल्या हृदयाचे रक्त जाळून इस्लामचा दिवा अखेरच्या क्षणापर्यंत तेवत ठेवणारी ही ख़दीजा (रज़ि.)! तिच्या मृत्यूपर्यंत प्रेषितांनी दुसरा विवाह केला नाही. या पत्नीवर प्रेषितांचे खूप प्रेम होते. ख़दीजा (रज़ि.) यांनी अशा कठीण परिस्थितीतही आपले घरदार मोठ्या कौशल्याने सांभाळले, आपल्या मुलांबाळाची देखरेख, शिक्षण-प्रशिक्षण मोठ्या कसबीने केले, मोठ्या प्रेम व श्रद्धेने पतीची सेवाही केली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व मिळाल्याच्या सात वर्षांनंतर मक्का

शहरातील इस्लाम-विरोधकांनी प्रेषितांच्या समस्त परिवारास समाजबहिष्कृत केले. या कठीण समयी ख़दीजा (रज़ि.) यादेखील प्रेषितांबरोबर होत्या. तब्बल तीन वर्षांपर्यंत समाजबहिष्काराचे हे संकट ख़दीजा (रज़ि.) यांनी मोठ्या धैर्य आणि संयमाने झेलले. यानंतर मात्र त्यांची प्रकृती खालावत गेली. प्रेषितांनीही त्यांच्या उपचारार्थ आकाश-पाताळ एक केले, मात्र वयाची पासष्ठ वर्षे झाली होती आणि अशातच ख़दीजा (रज़ि.) यांनी या ईहलोकाचा निरोप घेतला.

ख़दीजा (रज़ि.) यांच्या मृत्यूमुळे प्रेषित मुहम्मद (स.) पार खचून गेले. त्यांचा जीव कासावीस झाला. मन कशातच रमत नव्हते. घरात भयान शांतता होती. अशातच प्रेषितांना घरदार व परिवार सांभाळण्याकरिता सौदा (रज़ि.) यांच्याशी लग्न करावे लागले. मात्र त्यांच्या हृदयातून ख़दीजा (रज़ि.) यांची आठवण कधी गेली नाही. ते आपल्या इतर पत्नींसमोरही तोंड भरून ख़दीजा (रज़ि.) यांची प्रशंसा नि कौतुक करीत. एकदा प्रेषितांची तरूण पत्नी आयशा (रज़ि.) म्हणाली,

''हे ईश्वराच्या प्रेषिता! ख़दीजा (रज़ि.) एक वयोवृद्ध स्त्री होती. ईश्वराने तुम्हांस तिच्यापेक्षाही तरूण आणि सुंदर पत्नी दिल्या. तरीसुद्धा तुम्ही प्रत्येक क्षणी तिचीच आठवण करता!''

आयशा (रज़ि.) ही खूप निरागस आणि भाबड्या स्वभावाची प्रेषितपत्नी, मनात काहीही न ठेवता दिलखुलासपणे बोलणारी. तिने आपल्या मनातील शब्दांना वाट करून दिली. आयशाचे हे शब्द ऐकताच प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपली नाराजी लपविता आली नाही. ते तिला म्हणाले,

''आयशा! ईश्वराची शपथ ! मला ख़दीजापेक्षा चांगली पत्नी मिळाली नाही. तिने अशाप्रसंगी इस्लामचा स्वीकार केला, जेव्हा लोक इस्लामद्रोही होते. तिने अशाप्रसंगी सत्य कवटाळले, जेव्हा सर्वांनी सत्याचा इन्कार केला. तिने अशा वेळी माझी साथ दिली, जेव्हा सर्वांनी मला धिक्कारले, तिने अशा वेळी इस्लामसाठी आपली संपत्ती खर्च केली, जेव्हा सर्वांनी माझे सर्वस्व हिरावून घेतले. तिच्यापासून मला मुले झाली.''

असे बोलताना प्रेषितांना गहिवरून आले. आयशा (रज़ि.) यांचे कथन आहे की, प्रेषित मुहम्मद (स.) यांची ही अवस्था पाहून तर माझ्या तोंडचे पाणी पळाले आणि मी ठरविले की, यानंतर मी कधीच ख़दीजाविषयी प्रेषितांसमोर असे काही बोलणार नाही.

प्रेषित मुहम्मद (स.) यांना ख़दीजा (रज़ि.) यांच्या पोटी सहा मुले झाली.

## प्रकरण तिसरे

# प्रेषित मुहम्मद (स.) यांची मुले-मुली

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांना तीन मुलगे व चार मुली होत्या. माननीय क़ासिम (रज़ि.), माननीय अब्दुल्लाह (रज़ि.), माननीय इब्राहीम (रज़ि.) हे तीन मुलगे, जे बालवयातच मृत्यू पावले आणि चार मुली अनुक्रमे माननीय झैनब (रज़ि.), माननीय रूकैया (रज़ि.), माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.) आणि माननीय फ़ातिमा (रज़ि.) या होत. या सात मुलांपैकी सहा मुले ख़दीजा (रज़ि.) यांच्या आणि एक मुलगा इब्राहीम (रज़ि.) मारीया (रज़ि.) यांच्या पोटी जन्मला. पुढील प्रकरणात आपण प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या एकेक मुलीविषयी थोडक्यात चर्चा करू या.

## १) माननीय झैनब (रज़ि.)

सय्यदा झैनब (रज़ि.) ही आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांची ज्येष्ठ कन्या. मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व मिळण्याच्या दहा वर्षांपूर्वी मक्का शहरात ख़दीजा (रज़ि.) यांच्या पोटी जन्मली. या वेळी प्रेषितांचे वय तीस वर्षांचे होते. झैनब (रज़ि.) यांचे बालपणातच आपल्या मावसभाऊ 'अबुल आस' बरोबर लग्न झाले. मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व प्राप्त होताच आपल्या आई ख़दीजाबरोबर तिनेही इस्लामचा स्वीकार केला.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामचा प्रचार सुरु करताच विरोधकांनी त्यांचा छळ करण्यास सुरुवात केली. प्रेषितांबरोबरच त्यांच्या अनुयायांचाही निष्ठूर छळ सुरू झाला. झैनब (रज़ि.) हे पाहून खूप दुःखी कष्टी होत. 'ग़ामदी'चे कथन आहे की, एकदा मी आपल्या पित्यासोबत हज करण्यासाठी काबागृहात गेलो. तेथे मीनाच्या पर्वतावर बरेच लोक जमलेले होते. चौकशीअंती लोकांनी आम्हास सांगितले की एक माणूस लोकांना मूर्तीपूजा सोडून एका ईश्वराची बंदगी करण्याचा संदेश देत आहे. मी आणि माझे वडील उंटावर स्वार होतो. मी आपला उंट त्या जमलेल्या गर्दीकडे वळविला. पाहतो तर काय, मुहम्मद (स.) यांनी लोकांना इस्लाम समजाऊन सांगत आहेत आणि मक्का शहरातील त्यांचे विरोधक कोणी त्यांच्यावर दगडे भिरकावित आहेत तर कोणी त्यांच्याविषयी अपमानास्पद शब्दांचा वापर करीत आहेत, कोणी त्यांना शिवीगाळ करीत आहेत, तर कोणी टर उडवित आहेत. तरीसुद्धा प्रेषित मुहम्मद (स.) तठस्त आणि निर्भीडपणे आपले संभाषण चालूच ठेवीत आहेत. काही लोकांनी त्यांना धक्काबुक्कीसुद्धा केली. अशातच बराच दिवस चढला. उन्ह प्रखर झाले. वाळवंटातील तापमान वाढत गेले. इतक्यात एका हातात पाण्याचे मडके नि दुसऱ्या हातात रूमाल

घेऊन एक तरूणी आली. ती विरोधकांचा हा व्यवहार पाहून रडू लागली. प्रेषितांनी तिच्या हातून पाण्याचे मडके घेतले, वुज़ू केला (हात, पाय व चेहरा धुण्याची इस्लामी पद्धत), रूमालाने चेहरा पुसला आणि म्हणाले,

"बेटा, दुःखी होऊ नकोस, रडू नकोस, संयम आणि धीर धर, आपल्या बापाला त्रास देण्याचे वाईट वाटून घेऊ नकोस! हे दिवस नेहमी असेच राहणार नाहीत."

मी विचारले, "ही मुलगी कोण आहे?" मुहम्मद (स.) यांची कन्या! "लोकांनी मला सांगितले." (संदर्भ : बुखारी - हदीससंग्रह)

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या दोन कन्या अनुक्रमे 'रुक़ैया (रज़ि.)' आणि 'उम्मे कुलसूम (रज़ि.)' यांचा विवाह इस्लामचा कट्टर विरोधक अबू लहब (प्रेषितांचा सख्खा चुलता) याच्या दोन मुलांशी झाला होता.

इस्लामचा प्रचार सहन न होऊ शकलेल्या अबू लहबने आपल्या दोन्ही मुलांना प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या दोन्ही कन्यांना घटस्फोट देण्याचा आदेश दिला. इस्लाम-विरोधकांनी झैनब (रज़ि.) यांचे पती 'अबुलआस' यांना देखील झैनबला (रज़ि.) घटस्फोट देण्यासाठी खूप मनधरणी केली. मात्र त्यांनी कोणालाच न जुमानता आपल्या पत्नीशी अर्थात झैनबशी खूप चांगले वर्तन व वागणूक केली. प्रेषित मुहम्मद (स.) आपली मायभूमी मक्का त्यागून मदीना शहरी विसावले. या काळात झैनब (रज़ि.) आपल्या सासुरवाडीतच होत्या.

हिजरी सन दोनमध्ये रमजान महिन्यात 'बदर'च्या मैदानात मुस्लिम सैनिक आणि इस्लामद्रोह्यांत घमासान झाले. इस्लामी लष्कर विजयी झाले. विरोधी सैन्यातील बरेच सूरमा आणि योद्धे ठार झाले व बरेच कैदी बनविण्यात आले. या कैद्यांमध्येच प्रेषित मुहम्मद (स.) यांचे जावई अबूल आससुद्धा होते. कारण त्यांनी अद्याप इस्लाम स्वीकारलेला नव्हता आणि शत्रुच्या सैन्यात सामील होऊन इस्लामी लष्कराशी युद्ध करीत असताना कैदी करण्यात आले. मक्केतील विरोधकांना जेव्हा ही वार्ता मिळाली, तेव्हा त्यांनी कैदी करण्यात आलेल्या आपापल्या नातलगांना सोडविण्यासाठी प्रेषितांच्या सेवेत दंडाची रक्कम पाठविली. 'झैनब (रज़ि.)' अर्थात प्रेषितकन्यासुद्धा आपल्या पतीसंबंधी चिंतीत होती. तिने आपला दीर 'अमरु बिनुल रबी' यास आपल्या गळ्यातील हार देऊन प्रेषिताकडे पाठविले नि विनंती केली की हा हार दंड म्हणून घ्यावा आणि माझ्या पतीस (अर्थात आपल्या जावयास) सोडावे. हा हार झैनबला (रज़ि.) तिची आई म्हणजेच प्रेषितांची सर्वांत जास्त प्रिय पत्नी ख़दीजा (रज़ि.) यांनी लग्नाच्या वेळी भेट म्हणून दिला होता. तिचा दीर हा हार घेऊन आपल्या भावास म्हणजेच झैनब (रज़ि.) च्या पतीस सोडविण्यासाठी प्रेषितांसमोर हजर झाला नि त्यांना सुपुर्द केला.

तेव्हा हा हार पाहताच प्रेषितांना गहीवरून आले. हा हार आपल्या प्रिय पत्नीचा आहे, जी आज़ आपल्याला आणि अत्यंत जीवलग पत्नीचा आहे, जी आपल्याला सोडून परलोकी गेली. त्यांचे डोळे पाणावले. मग प्रेषितांनी आपल्या सोबत्यांना म्हटले,

"तुम्हांस योग्य वाटत असेल वा तुमची परवानगी असेल तर, हा हार 'झैनबला परत पाठवून देऊ, कारण हा हार तिच्या मृत आईची निशाणी आहे. 'अबूल आस' ने झैनबला तत्काळ मदीना शहरी सुखरूपपणे घेऊन यावे, हाच त्याला सुटकेस्तव दंड आकारण्यात येईल."

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या समस्त सोबत्यांनी एकमुखाने होकर दिला आणि प्रेषितजावई 'अबुलआस' ने प्रेषितांची ही अट मान्य केली. त्याची सुटका करण्यात आली नि ते सरळ मक्का शहरी पोचले. प्रेषित मुहम्मद (स.) यांना दिलेल्या वचनानुसार त्यांनी आपला भाऊ 'कनाना' बरोबर झैनब (रज़ि.) यांना मदीनकडे अर्थात प्रेषितांकडे रवाना केले. मक्का शहरातील इस्लामद्रोह्यांना या गोष्टीची वार्ता मिळताच ते संतापाने पिसाळून उठले. तलवारी त्यातून बाहेर आल्या नि कनाना व झैनब (रज़ि.) यांचा पाठलाग त्यांनी सुरु केला. 'झीतबा' याठिकाणी त्यांनी या दोघा दीर-भावजयींस घेतले. झैनब (रज़ि.) उंटावर स्वार होत्या. इतक्यात शत्रुंतील 'हिबार बिन असवद' याने भाला फेकून झैनब (रज़ि.) यांना उंटावरून खाली पाडले. त्या गरोदर होत्या त्यांचा खाली पडल्याने गर्भपात झाला. त्या गंभीर जखमी झाल्या. 'कनाना' याने तत्काळ बाण काढून धनुष्यास लावून शत्रुंना चेतावले, तो किंचाळला,

"खबरदार ! एकहीजन पुढे सरकला तर एकेकांचे मुडदे पाडीन !!!" इतक्यात मक्केचे सरदार अबू सुफियान (यांनी अद्याप इस्लाम स्वीकारला नव्हता.) तेथे पोचले, नि कनानास म्हणालो,

"बाण धनुष्यातून सोडू नका, मला तुमच्याशी बोलायचे आहे."

"पटकन बोला, काय बोलायचे ते !" कनाना संतापाने म्हणाला.

यावर सरदार अबू सुफियान उत्तरले,

"हे बघ कनाना ! मी मक्का शहराचा सरदार आहे. तुला माहीतच आहे की, मुहम्मद (स.) आणि त्यांच्या मूठभर लष्कराकडून आम्हाला किती अपमानास्पद पराभव पत्करावा लागला. जर तु त्यांची मुलगी अशा उघड आणि सर्वांसमक्ष घेऊन जाशील तर आमचा आणखीनच जास्त अपमान होईल, मी तर कोणासही तोंड दाखविण्याच्या लायकीचा राहणार नाही. म्हणून तुला माझी विनंती आहे की, तु झैनबला घेऊन मक्का शहरी परत चल. मग एखाद्या वेळी संधी पाहून गुप्तपणे तिला मदीना शहरी सुखरूपपणे तिच्या वडिलांच्या (अर्थात प्रेषितांच्या) स्वाधीन कर."

कनानाने सरदार अबू सुफियानची विंनंती मान्य केली. काही दिवस लोटल्यावर गुप्तपणे झैनबला प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे घेऊन गेला. झैनबला प्रेषितांच्या स्वाधीन करून कनाना मक्का शहरी परतला.

अबुल आसचे आपली पत्नी झैनब (रज़ि.) वर खूप प्रेम होते. तो पत्नीच्या विरहाने खचून गेला. मक्का शहरातील हा प्रामाणिक आणि पवित्र आचरणाचा तरूण मक्कावासीयांच्या समस्त ठेवी परत करून म्हणाला, ''हे मक्कावासीयांनो, आता तुमचा कोणत्याही प्रकारचा माल, वस्तु वा इतर कोणत्याही प्रकारची ठेव माझ्याकडे नाही, हे खरे आहे काय?''

''होय ! अबुल आस ! हे खरे आहे !!'' सर्वांनी एकमुखाने उत्तर दिले. मग तो म्हणाला,

''तर मग कान देऊन ऐका ! आता मी इस्लामचा स्वीकार करीत आहे ! कारण आता माझ्याकडे कोणाचे काहीही नाही. उद्या कोणी म्हणू नये की मी कोणाची अनामत गिळली.''

असे सांगून ते सरळ मदीनेस प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सेवेत निघाले. मदीना पोचल्यावर प्रेषितांनी झैनब (रज़ि.) आणि अबुल आस (रज़ि.) यांचा परत विवाह केला.

या घटनेनंतर मात्र प्रेषिताची ही कन्या जास्त दिवस जगली नाही. गरोदरपणात उंटावरून पडल्याने तिचा गर्भपात झाला होता. यानंतर तिची प्रकृती खालावतच गेली आणि हिजरीसन आठमध्ये तिने या इहलोकाचा निरोप घेतला. तिच्या निधनामुळे प्रेषितांना कमालीचा धक्का बसला. त्यांच्या डोळ्यांतून ढळ-ढळा अश्रु वाहत होते.

''झैनब (रज़ि.) माझी खूप चांगली मुलगी होती. माझ्यामुळे तिलाही शत्रुंचा छळ सोसावा लागला.''

प्रेषितांच्या दु:खी-कष्टी अंत:करणातील भावना त्यांच्या शब्दांवाटे बाहेर आल्या. तिला दोन आपत्ये होती. एक मुलगा 'अली' आणि मुलगी 'उमामा'. मात्र 'अली' किशोरवयातच निधन पावला.

## २) माननीय रूक़ैया (रज़ि.)

प्रेषित मुहम्मद (स.) यांची दुसरी कन्या रूक़ैया (रज़ि.) त्यांना प्रेषितत्व मिळण्याच्या सात वर्षांपूर्वी जन्मली. रूक़ैया (रज़ि.) यांचा पहिला विवाह अबू लहबचा मुलगा 'उतबा'शी झाला होता. अबू लहब हा प्रेषितांचा सख्खा काका होता, नि तो प्रेषितांवर प्राण ओवाळायचा. मात्र प्रेषितांना प्रेषितत्व प्राप्त झाले नि त्यांनी उघडपणे एकेश्वरवादाचा संदेश दिला, तेव्हा अबू लहब त्यांच्या जिवाचा वैरी झाला. इतकेच नव्हे

तर त्याने आपल्या मुलास प्रेषितकन्या रूक़ैया (रज़ि.) ला घटस्फोट देण्याचा आदेश दिला. बापाच्या आदेशावर उतबाने पत्नीस सोडून दिले. निदान एवढे तरी बरे झाले होते की रूक़ैया (रज़ि.) लग्नानंतर सासरी गेली नव्हती. मुलीच्या घटस्फोटानंतर प्रेषितांनी आपल्या या कन्येचा विवाह माननीय उस्मान (रज़ि.) यांच्याशी केला. माननीय उस्मान (रज़ि.) हे उमैया परिवारातील प्रतिष्ठित आणि प्रामाणिक तरूण, इस्लामवर त्यांची खूप निष्ठा होती. प्रेषितांना त्यांनी इस्लाम स्थापनेकरिता तसेच अनाथ, गुलाम व दीन-दलितांकरिता सढळ हाताने संपत्ती अर्पण केली.

मक्का शहरात जेव्हा इस्लामद्रोह्यांनी इस्लामी आंदोलनकर्त्यांवर अन्याय व अत्याचाराची पराकाष्ठा केली, तेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या अनुयायांना ॲबीसीनीयाकडे स्थलांतर करण्याची परवानगी दिली. त्यामुळे हिजरी सन पाचमध्ये प्रेषितसोबत्यांचा एक काफिला ॲबीसीनीयास रवाना झाला. याच काफिल्यात माननीय उस्मान (रज़ि.) आपल्या पत्नीसोबत होते. तेथे काही काळ वास्तव्य केल्यावर माननीय उस्मान (रज़ि.) आपल्या पत्नी रूक़ैया (रज़ि.) समवेत मक्का शहरी परतले, मात्र शत्रुंचा छळ आणखीनच तीव्र झाला होता. नाविलाजाने दोघे पती-पत्नी परत ॲबीसीनीयास रवाना झाले. प्रेषितांना आपली कन्या आणि जावयाची खूप चिंता लागलेली होती. मात्र एके दिवशी एका स्त्रीने जावई नि कन्या ॲबीसीनीयास सुखरूप असण्याची खबर दिली आणि प्रेषितांना समाधान झाले. याप्रसंगी त्यांनी म्हटले,

''ईश्वर दोघांवर कृपाछत्र ठेवो, उस्मान (रज़ि.) ही पहिली व्यक्ती आहे, जिने इस्लामखातर सपत्निक हिजरत (स्थलांतर) केले.''

बऱ्याच काळानंतर उस्मान (रज़ि.) यांना खबर मिळाली की स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) मदीनेस स्थलांतर करणार आहेत. करीता काहीजणांसोबत ते आपली पत्नी रूक़ैयास (रज़ि.) घेऊन मक्का शहरी परतले आणि काही दिवसांनंतर प्रेषितांच्या परवानगीने मदीना शहरी स्थलांतरित झाले. हिजरी सन दोनमध्ये 'बदर' या ठिकाणी मुस्लिम आणि मक्कावासीयांत घमासान झाले. मात्र पत्नी रूक़ैया (रज़ि.) यांच्या आजारपणामुळे ते युद्धात सामील होऊ शकले नाहीत. कारण या वेळी रूक़ैया (रज़ि.) खूप आजारी होत्या. इकडे इस्लामी लष्कराने शत्रुचा दणदणीत पराभव केला. मैदान फत्ते करून प्रेषित मुहम्मद (स.) मदीनेस परतण्यापूर्वीच त्यांची ही दुसरी कन्या मरण पावली. त्यांना आपल्या या दुसऱ्या मुलीच्या निधनामुळे जबर धक्का बसला. मदीनेस पोचल्यावर ते रूक़ैया (रज़ि.) यांच्या कबरीवर पोचले. साश्रु नयनांनी उद्गारले,

''उस्मान मज़ऊन (रज़ि.) निघून गेले, आता तू पण जात आहेस !!!''

उस्मान मज़ऊन (रज़ि.) हे स्थलांतर करून आलेल्यांपैकी पहिले मुहाजिर (स्थलांतरित) होते, ज्यांचे निधन झाले होते.) माननीय फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा रूक़ैया

(रज़ि.) यांच्या कबरीजवळ बसून रडत होत्या नि प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या चादरीने तिचे डोळे पुसून सांत्वन करीत होते.

रूक़ैया (रज़ि.) ॲबीसीनियास असताना त्यांना एक मुलगा झाला होता. त्याचे नाव अब्दुल्लाह ठेवण्यात आले होते. आईच्या मृत्यूप्रसंगी तो चार वर्षांचा होता. दोन वर्षांनंतर तोसुद्धा मृत्यू पावला.

## ३) माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.)

माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.) ही प्रेषित मुहम्मद (स.) यांची तिसऱ्या क्रमांकाची कन्या, खदीजा (रज़ि.) यांच्या पोटी प्रेषितांना प्रेषितत्व मिळण्याच्या सहा वर्षांपूर्वी जन्मली. ती रूक़ैया (रज़ि.) पेक्षा एका वर्षांनी धाकटी आणि फ़ातिमा (रज़ि.) पेक्षा एका वर्षाने थोरली होती. तिचे लग्नसुद्धा प्रेषितांचे काका अबू लहबचा मुलगा उतैबाशी झाले. मागे उल्लेखल्याप्रमाणे अबू लहबने आपल्या मुलास प्रेषितांच्या या कन्येससुद्धा सोडून देण्याचा आदेश दिला. उम्मे कुलसूम (रज़ि.) ची थोरली बहीण रूक़ैया (रज़ि.) च्या निधनानंतर माननीय उस्मान (रज़ि.) पार खचून गेले होते. अगदी याच काळात माननीय उमर (रज़ि.) यांची कन्या हफ़्सा (रज़ि.) ही विधवा झाली होती. माननीय उमर (रज़ि.) यांना आपल्या विधवा मुलीची खूप चिंता वाटू लागली. त्यामुळे त्यांनी माननीय उस्मान (रज़ि.) यांना आपली मुलगी हफ़्सा (रज़ि.) शी विवाह करण्याची विनंती केली. मात्र उस्मान (रज़ि.) याकरिता तयार झाले नाहीत. प्रेषितांना या गोष्टीची खबर मिळाली तेव्हा त्यांनी माननीय उमर (रज़ि.) यांना सांगितले की, "मी तुम्हाला हफ़्सा (रज़ि.) करिता उस्मान (रज़ि.) पेक्षाही चांगल्या स्थळाचा आणि उस्मान (रज़ि.) करिता हफ़्सापेक्षाही अधिक चांगल्या स्थळाचा पत्ता देतो !" प्रेषितांचे हे शब्द ऐकून माननीय उमर (रज़ि.) यांची आपल्या कन्येविषयीची चिंताच दूर झाली. त्यांनी प्रेषितांकडे प्रश्नार्थक दृष्टी टाकली. यावर प्रेषित मुहम्मद (स.) उत्तरले की, तुमची कन्या हफ़्सा (रज़ि.) शी मी विवाह करतो नि उस्मान (रज़ि.) यांचा विवाह माझी कन्या उम्मे कुलसूम (रज़ि.) शी करतो. प्रेषितांची ही दर्यादिली ऐकून माननीय उमर (रज़ि.) अत्यानंदित झाले. लागलीच माननीय हफ़्सा (रज़ि.) यांचा विवाह आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी आणि उम्मे कुलसूम (रज़ि.) चा विवाह माननीय उस्मान (रज़ि.) यांच्याशी अगदी साध्या पद्धतीने पार पडला.

प्रेषित मुहम्मद (स.) यांची ही कन्यासुद्धा लग्नानंतर सहा वर्षेच जगली. हिजरी सन नऊच्या शाबान महिन्यात तिने आजारपणातच या इहलोकाचा निरोप घेतला नि प्रेषितांना एकानंतर एक अशा तीन कन्यांच्या निधनांचे अपार दु:ख झेलावे लागले.

## प्रकरण चौथे

# माननीय फ़ातिमा (रज़ि.)

माननीय फ़ातिमा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांची अत्यंत लाडकी आणि सर्वांत लहान कन्या. मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व मिळण्याच्या पांच वर्षांपूर्वी जमादिल-आखिर महिन्याच्या वीस तारखेस जन्मली. फ़ातिमा (रज़ि.) ही लहानपणापासूनच खूप लाजाळू स्वभावाची. अत्यंत मोजके व कमी बोलणारी. घरी सर्वांत धाकटी असल्याने प्रेषितांची आणि इतर परिवारजनांची खूप लाडकी. नेहमी बापाला चिटकून राहणारी. यामुळे प्रेषितांचा तिच्यावर खूप प्रभाव झालेला होता. तिच्या चालण्या-बोलण्याची, हसण्याची, वागण्याची चाल-रीत अगदी बापासारखीच. जणू बापावरच गेली, असे सगळेच म्हणत. तिचे बापावर खूप प्रेम. प्रेषित मुहम्मद (स.) बाहेरून येताना घराच्या दारासमोर उभे राहून सलाम करीत, बापाची आतुरतेने वाट पाहत असलेली फ़ातिमा (रज़ि.) धावतच आपल्या पित्याचे हसतमुखाने स्वागत करीत, त्यांचे बोट धरून त्यांना घरात घेत. प्रेषित घरात आल्यावर तिला आपल्या मांडीवर बसवीत, खूप प्रेमाने तिच्या ललाटाचा मुका घेत.

फ़ातिमा (रज़ि.) लहानपणापासूनच खूप बुद्धिमान होती. चित्र-विचित्र प्रश्न विचारून आई ख़दीजा (रज़ि.) यांना चक्रावून सोडीत असे. एकदा चिमुकली फ़ातिमा (रज़ि.) आईस म्हणाली,

"ईश्वराने आपणा सर्वांना निर्माण केले आणि जगातील प्रत्येक वस्तु निर्माण केली, मग तो आपल्याला दिसेल काय?" चिमुकलीचा हा विचित्र प्रश्न ऐकून माता ख़दीजा (रज़ि.) उत्तरली,

"बाळे! आपण या जगात जर ईश्वराची बंदगी केली, त्याच्या बंद्यांबरोबर (मानवांबरोबर) चांगले वर्तन केले, समाजाची मनोभावाने सेवा केली, ईश्वराने निषिद्ध केलेल्या बाबींपासून दूर राहिलो, त्याच्यात कोणासही भागीदार ठरविले नाही, तर अंतिम निवाड्याच्या दिवशी नक्कीच आपल्याला ईश्वराचे दर्शन होईल."

प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या चिमुकल्या फ़ातिमास ईश्वराच्या, ईशपरायणतेच्या आणि सदाचाराच्या गोष्टी सांगून तिला इस्लामचे बाळकडू देत. तिची स्मरणशक्ती प्रचंड होती. एकदा ऐकलेले परत कधीच ती विसरत नसे. तिच्यात लहानपणापासूनच इतरांविषयी कळवळा, त्याग आणि बंधुत्वाची भावना होती. अत्यंत साध्या राहणीची भोक्ती फ़ातिमा (रज़ि.) परिवारात सर्वांचीच लाडकी होती.

मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व मिळाल्यावर तीन वर्षांपर्यंत ते अत्यंत गुप्तरित्या सत्याचा संदेश देत होते. चौथ्या वर्षी ईश्वराचा आदेश अवतरला,

"ईश्वराचे आदेश स्पष्ट व सडेतोडपणे लोकांपर्यंत पोचवा आणि त्यांच्या विरोधाची पर्वा करू नका!" (संदर्भ : क़ुरआन)

हा आदेश येताच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी उघडपणे इस्लामचा संदेश देण्यास सुरुवात केली आणि कालचे स्नेही व मित्र त्यांचे कट्टर वैरी झाले. प्रेषितांचा प्रामाणिकपणा आणि सदाचाराचे गोडवे गाणारे कुरैश परिवारजन आज त्यांच्या जिवावर बेतले होते. विरोधकांचे दोन गट होते. पैकी एक गट विरोधक असूनही प्रेषितांना शारीरिक इजा देण्यास सहमत नव्हता. हा गट उतबा, शैबा, सरदार अबू सुफियान वगैरेचा होता. तर दुसरा गट मात्र अत्यंत निष्ठूर निर्दयी आणि खालच्या पातळीचा होता. या गटात प्रामुख्याने प्रेषितकाका अबू लहब, अबू जहल, उक़बा, असवद, वलीद, अदी, नझर, वलीद वगैरे सामील होते. अर्थातच या विरोधकांचे मवाळ आणि जहाल असे दोन गट होते. यापैकी जहालगट प्रेषितांवर सूडाच्या भावनेने पिसाळून प्रेषित आणि त्यांच्या आंदोलकांवर अत्यंत अमानवी अत्याचारांची शृंखलाच सुरु केली होती. प्रेषितत्वाच्या दहाव्या वर्षी प्रेषितांचे काका अबू तालिब आणि ख़दीजा (रज़ि.) हयात असल्याने विरोधकांची प्रेषितांचा विरोध करण्याची जास्त हिंमत होत नव्हती. कारण या दोन्ही मक्का शहरातील प्रतिष्ठित आणि वजनदार व्यक्ती होत्या. त्यांच्या पाठबळामुळे प्रेषितांना खूप धीर मिळालेला होता. मात्र त्यांच्या निधनानंतर विरोधकांना मोकळे रान मिळाले. इतिहासात कोणावर नव्हे तेवढे अत्याचार प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायांवर करण्यात आले. इतिहासाने कधी नव्हे ते अत्याचार या काळात पाहिले. शारीरिक आणि मानसिक अत्याचारांतील कोणताही असा अत्याचार बाकी ठेवण्यात आला नाही, जो त्यांच्यावर करण्यात आलेला नसेल. अशा कठीण आणि अत्यंत बिकट परिस्थितीमध्येसुद्धा चिमुकली फ़ातिमा (रज़ि.) आपल्या पित्याला धीर देत, त्यांचे सांत्वन करीत. तिच्या या चिमुकल्या आणि निरागस पिता-प्रेमामुळे प्रेषित मुहम्मद (स.) यांना गहिवरून येत खूप हुरुप येत. प्रेषितांना आपल्या अनुयायांच्या छळाचे खूप दुःख होत, त्यांच्या अवार्त टाहोमुळे प्रेषितांचे काळीज फाटत. अशाप्रसंगी या जगात प्रेषित एकाकी पडलेले, कोणाचाही सहारा नसलेले, त्यांना अशाप्रसंगी केवळ चिमुकल्या फ़ातिमाचाच सहारा होता. इस्लामी आंदोलनाकरिता फ़ातिमा (रज़ि.) खूप काळीज जाळायची, प्रेषितांना खूप धीर द्यायची. पित्यावरील अत्याचार पाहून जेव्हा ती मुसमुसून रडत, तेव्हा प्रेषित मोठ्या प्रेमाने तिला जवळ घेत, तिचे अश्रु पुसत, सांत्वनपूर्ण स्वरात म्हणत,

"माझ्या लेकी ! घाबरू नकोस ईश्वर तुझ्या बापाला एकाकी सोडणार नाही."

सत्यप्रचारार्थ छळले गेलेल्या प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडे फातिमा (रज़ि.) आपल्या दोन्ही थोरल्या बहिणींबरोबर धावतच जायची नि प्रेषितांना धीर द्यायची. पित्याचा छळ पाहून तिने कधीच सत्यसाधनेपासून पित्यास रोखले नाही, हे विशेष!

प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या अनुयायांना छळण्याच्या असंख्य

घटनांपैकी एक-दोन घटनांचा या ठिकाणी उल्लेख करण्यात येत आहे. एकदा प्रेषित मुहम्मद (स.) हे क़ाबागृहात नमाज अदा करीत होते. विरोधकांनी हे दृष्य पाहिले, पार चवताळून उठले. त्यांनी एका माणसाकडून उंट कापल्यावर निघणारी मोठी आतडी मागविली. प्रेषित मुहम्मद (स.) हे सजदा करीत असताना त्यांच्या पाठीवर टाकले. उंटाचे मोठे आतडे खूप वजनदार असते. यामुळे प्रेषितांना उठता येणे अशक्य झाले. आतड्यांतील घाण पदार्थ प्रेषितांच्या अंगावर पडला नि त्यांनी खूप त्रास झाला. हे दृष्य पाहून इस्लामद्रोही खूप हसू लागले. हे विदारक दृष्य पाहून अब्दुल्लाह बिन मसऊद (रज़ि.) (यांनी अद्याप इस्लाम स्वीकारला नव्हता) धावतच प्रेषितांच्या घरी गेले आणि सगळी हकीकत सांगितली. चिमुकली फ़ातिमा (रज़ि.) धावतच आपल्या पित्याच्या मदतीस आली. रडत-रडत आपल्या पित्याच्या चेहऱ्यावरून आतड्यातील लागलेले रक्त आणि मल पुसू लागली. शत्रू त्यांची टर उडवून हसू लागले. फ़ातिमा (रज़ि.) यांनी त्यांच्याकडे क्षुब्ध होऊन म्हटले,

"वैऱ्यांनो ! प्रभू ईश्वर तुम्हास या अपराधाची शिक्षा अवश्य देईल !!!"

तिने विरोधकांना जणू शापच दिला आणि ईश्वराच्या ममत्वसागरास तुफान आले. बदरच्या युद्धात प्रेषित मुहम्मद (स.) यांना छळणारे अबू जहल, उक़बा, उमैया बिन खल्फ़, उतबा बिन रबिया, शैबा बिन रबिया हे अपमानास्पद मृत्यू पावले.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रज़ि.) यांचे कथन आहे की, एकदा अबू जहल या इस्लामद्रोह्याने चिमुकली फ़ातिमा (रज़ि.) यांच्या मुखात विनाकारण चापट मारली नि ती जिवाच्या आकांताने टाहो फोडित प्रेषितांकडे आली, प्रेषितांना आपल्या निरागस फ़ातिमाचा लालबुंद झालेला आणि अश्रुंनी चिंब झालेला गाल पाहून अत्याधिक दु:ख झाले. म्हणाले,

"बेटा ! सरदार अबू सुफ़ियानकडे जाऊन अबू जहलची तक्रार कर !"

फ़ातिमा (रज़ि.) सरळ अबू सुफियान (यांनी अद्याप इस्लाम स्वीकारला नव्हता) कडे जाऊन क्रूरकर्म्या अबू जहलची तक्रार केली. तिचे बोट धरून सरदार अबू सुफियान थेट अबू जहलकडे आले नि म्हणाले,

"मुली आता तूसुद्धा याच्या गालफडात पूर्ण ताकदीनिशी झापड मार ! बाकी त्याने काही केले तर मी स्वत: पाहून घेतो !"

फ़ातिमा (रज़ि.) ने त्याच्या कानाखाली आवाज काढला आणि पित्यांना ही सर्व कहानी सांगितली. प्रेषित मुहम्मद (स.) यांना आत्मसमाधान झाले, त्यांनी ईश्वरासमोर हात फैलावून प्रार्थना केली,

"हे परमदयाळू ईश्वरा ! अबू सुफियानचे हे पुण्यकर्म विसरू नकोस !!!"

प्रेषितांच्या याच प्रार्थनेमुळे सरदार अबू सुफियान यांना इस्लाम स्वीकारण्याची ईश्वराने सद्‌बुद्धी दिली.

प्रकरण पाचवे

## सामाजिक बहिष्काराची झळ

मुहम्मद (स.) यांना प्रेषितत्व मिळून सहावे वर्ष लागले होते. या वर्षी प्रेषितांचे काका माननीय हमज़ा (रज़ि.) आणि मक्का शहरातील अत्यंत धाडसी तरूण माननीय उमर (रज़ि.) या दोघांनी इस्लाम स्वीकारला. या घटनेमुळे विरोधकांचे धाबे दणाणले. पिसाळलेल्या श्वापदांप्रमाणे चवताळून उठले. त्यांच्या संतापाला पारावर उरला नाही. विरोधकांनी शहरातील समस्त प्रतिष्ठित मान्यवरांची तत्काळ बैठक बोलावली. सल्लामसलत सुरु झाली आणि या निर्णयावर सर्वांची सहमती झाली की, "जोपर्यंत हाशिम परिवार आणि मुतल्लिब परिवार मुहम्मद (स.) यांना त्यांची हत्या करण्यासाठी आपल्या स्वाधीन करीत नाहीत, तोपर्यंत या दोन्ही परिवारांचा समाज-बहिष्कार करण्यात यावा. त्यांच्याशी कोणत्याही प्रकारचा व्यवहार करता कामा नये, त्यांना कोणतीही वस्तु विकता कामा नये, त्यांच्याकडून कोणतीही वस्तू खरेदी करता कामा नये, त्यांच्याशी कोणत्याही प्रकारचे नाते आणि संबंध ठेवता कामा नये." हा करार एका लखोट्यावर लिहून त्यावर सर्वांच्या सह्या घेऊन काबागृहाच्या दर्शनी भागावर लावण्यात आला.

हाशिम आणि मुतल्लिब परिवारास जेव्हा या अन्यायी करारासंबंधी माहिती मिळाली तेव्हा किंचितही न डगमगता हाशिम परिवारजनांनी हा निर्णय धुडकावून लावला. कोणत्याही परिस्थितीत प्रेषित मुहम्मद (स.) यांना ठार करण्यासाठी शत्रुच्या स्वाधीन करायचे नाही, असा चंग बांधला आणि आपल्या परिवारजनांना घेऊन 'अबी तालिब' या दऱ्यांमध्ये आश्रय घेतला. विरोधकांनी हाशिम आणि मतल्लिब परिवाराने आश्रय घेतलेल्या या दऱ्यांस वेढा देऊन नाकेबंदी केली. ही नाकेबंदी इतकी कडक करण्यात आली की, आश्रितांचे अन्नपाणीसुद्धा बंद करण्यात आले. बाहेरून कोणी जर अन्न अथवा खाण्याच्या वस्तु घेऊन आला तर त्याच्या सर्व वस्तु विरोधक खरेदी करून घेत, जेणेकरून आश्रितांपर्यंत काहीही पोचू नये. आश्रितांवर उपासमारीची पाळी आली, लहान मुले भुकेने व्याकूळ झाली, मातांच्या स्तनांतील दूध सुकत गेले. माननीय अबू बकर (रज़ि.) आणि इतर स्नेही लपून-छपून काही खाद्यान्न आश्रितांना पाठवित, मात्र हे खाद्यान्न सर्वांसाठी अपुरे पडत, काही काळातच ते संपून जात. शेवटी झाडांचा पालापाचोळा ओरबाडून पोटाची आग शमविण्याची पाळी येई. फ़ातिमा (रज़ि.) हीसुद्धा आपले प्रिय पिता नि नातलगांसोबत हे हलाखीचे जीवन मोठ्या धैर्याने कंठीत होती. दरवर्षी हज करण्याच्या मोसमात प्रेषित मुहम्मद (स.) मोठ्या धैर्याने काबागृहात जात आणि हजला येणाऱ्या लोकांसमोर सडेतोडपणे एकेश्वरवादाचा संदेश देत, इस्लामची शिकवण देत. त्यांचा चुलता आणि इस्लामचा विरोधक अबू लहब हा प्रेषितांचे भाषण संपताच लोकांना उद्देशून सांगत,

"हा माझा पुतण्याच आहे, तो वेडाने झपाटला आहे, त्याच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नका!"

## सामाजिक बहिष्काराची समाप्ती

विरोधकांमध्ये काहीजणांवर प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पवित्र आचरण आणि प्रामाणिकता व परोपकाराचा कमालीचा प्रभाव होता. त्यामुळे मुहम्मद (स.) आणि त्यांच्या परिवारातील या शेकडो सदस्यांशी सामाजिक बहिष्कारासारख्या निष्ठूर निर्णयाविषयी बरेचजन नाराजसुद्धा होते. मात्र कट्टर आणि जहाल विरोधकांशी वैर घेण्याची त्यांची हिंमत होत नव्हती. मात्र एके दिवशी एक विचित्र घटना घडली. खदीजा (रज़ि.) यांचा (प्रेषितांची (स.) भार्या) पुतण्या हकीम याने (अद्याप इस्लाम स्वीकारला नव्हता) थोडेसे गहू आपली आत्या खदीजा (रज़ि.) यांच्याकडे आपल्या नोकराकरवी पाठविले. रस्त्यात अबू जहल भेटला, विचारले,

''हे गहू कोणाला देण्यासाठी तू घेऊन जात आहेस?''

''अबी तालिबच्या दऱ्यांत खदीजासाठी'' तो उत्तरला. अबू जहलने त्यास अडविले आणि रागाच्या भरात किंचाळला,

''हाशिम परिवारासाठी एक दानाही घेऊन जाऊ देणार नाही.''

योगायोगाने तिकडून अबुल बख्तरी हा श्रीमंत जात होता. दोघांची हमरीतुमरी पाहून तो थांबला,

''आपसात काय किरकिर चालू आहे?''

त्याने विचारले. यावर अबू जहलने हकीकत सांगितली आणि म्हणाला,

''समाज-बहिष्काराचा करार झाला आणि यानुसार कोणतीही वस्तु दऱ्यातील आश्रितांना पोचता कामा नये. मात्र हा माणूस कराराविरुद्ध त्यांना गहू नेऊन देत आहे.''

यावर अबुल बख्तरी म्हणाला,

''खदीजा (रज़ि.) यांनी थोडेसे गहू आपल्या पुतण्याकडे ठेवले होते, तिचे तिला परत करण्यात काय बिघडले?''

हे ऐकून अबू जहल बिघडला नि म्हणाला,

''तुलाही हाशिम परिवाराचा भलताच कनवळा आलेला दिसतो. मात्र हे गहू मी तिथपर्यंत पोचू देणार नाही.''

आता मात्र अबुल बख्तरीलासुद्धा संताप चढला आणि तो कडकून म्हणाला,

''आता मी पाहतो, तू हे गहू कसे पोचू देत नाही.''

आणि असे म्हणताच त्याने अबू जहलची गचांडी धरून वर उचलले आणि जमिनीवर त्यास आपटी दिली, लाथा-बुक्क्यांनी खूप बदडले, अबू जहल रक्तबंबाळ झाला. अबुल बख्तरीच्या या रुद्रावताराने अबू जहल गांगारून गेला आणि तेथून पसार झाला. यानंतर हकीमच्या नोकराने ते गहू अबीतालिबच्या दऱ्यातील आश्रितांना नेऊन दिले.

अबू जहलने सपाटून मार खाल्ल्याची घटना वाऱ्यासारखी पूर्ण शहरात पसरली. या घटनेमुळे आणखीन काहीजन प्रेषित मुहम्मद (स.) आणि त्यांच्या हाशिम परिवारजनांचा कैवार घेऊ लागले. हळूहळू बरेचजन या अत्याचारी समाज-बहिष्काराचा विरोध करू लागले. मखजूम परिवारातील एक दयाळू माणूस हिश्शाम हा अब्दुल मुतल्लिब यांचे नातू जुबैरकडे आला नि म्हणाला,

"हे ज़ुबैर ! तुमचे माता उपाशी-तापाशी असताना तुम्हाला हे अन्न कसे काय गोड वाटते?"

यावर ज़ुबैर म्हणाले,

"हे बंधु ! मी विवश आहे. माझ्यात सामर्थ्य असते तर या निष्ठूर कराराचा किस्साच तमाम केला असता. मात्र मी एकटाच आहे."

यावर हिश्शाम म्हणाला,

"मी तुमची साथ देतो. जरा धैर्याने काम केले तर बरेच लोक आपल्या मदतीस येतील."

यानंतर हे दोघे 'मुतआम'कडे आले. येथून ज़मीआ आणि अबुल बख्तरीचीसुद्धा साथ मिळविली आणि दुसऱ्या दिवशी हाशिम आणि मुत्तलिब परिवारांच्या आणखीन काही समर्थकांना घेऊन काबागृहात कुरैश परिवारजनांना जमा करून त्यांना संबोधित केले,

"हे कुरैश परिवाराच्या स्वाभिमानी लोकांनो ! हा अन्याय व अत्याचार नव्हे काय की आपण पोटभरून खावे आणि हाशिम व मुत्तलिब परिवारातील आपलेच भाऊबंद अन्नाच्या एकेक कणासाठी तरसायचे? त्यांच्या स्त्रिया, मुले भुकेने व्याकुळ व्हायचे. ईश्वराची शपथ, जोपर्यंत हा करार लिहून लावलेला हा लखोटा फाडून फेकला जात नाही, आम्ही स्वस्थ बसणार नाहीत."

या भाषणाचा अबू जहलला भलताच संताप चढला नी पुढे सरसावून म्हणाला,

"हिंमत असेल तर या लखोट्यास कोणी हात लावूनच दाखवावे. जोपर्यंत हाशिम परिवार मुहम्मद (स.) यांना ठार करण्यासाठी आमच्या स्वाधीन करीत नाही, तोपर्यंत हा करार कायमच राहणार !"

इतक्यात 'जमआ' समोर येऊन त्वेषाने म्हणाला,

"खोटारड्या ! आम्ही सुरुवातीपासूनच या कराराशी सहमत नव्हतो."

इतक्यात मुतआम आणि अबुल बख्तरी हे दोघे पुढे सरसावले आणि तीन वर्षांपासून लावलेल्या कराराचा जीर्णशीर्ण लखोटा फाडून टाकला. अशा प्रकारे सलग तीन वर्षांचा हा सामाजिक बहिष्कार संपुष्टात आला. प्रेषित मुहम्मद (स.) आणि हाशिम व मुत्तलिब परिवारांना शहरात घेण्यात आले. या अत्यंत कठीण आणि बिकट परिस्थितीतसुद्धा प्रेषित मुहम्मद (स.) यांचे धैर्य आणि संयम सुटले नाही. त्यांनी आपले आंदोलन सुरुच ठेवले.

## प्रकरण सहावे

# दुःखाचे वर्ष

तीन वर्षांचा समाज-बहिष्कार संपुष्टात आला नि प्रेषित मुहम्मद (स.) यांना थोडे समाधान वाटले. मात्र जास्त काळ संपला नव्हता की आणखीन जबरदस्त संकट प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर कोसळले. प्रेषितत्वाचे हे दहावे वर्ष होते. प्रेषितांना सर्वोपरी मदत करणारे त्यांचे काका अबू तालिब आणि इस्लाम व प्रेषितांसाठी आपले सर्वस्व अर्पण करणारी भार्या खदीजा (रज़ि.) निधन पावले. या दोघांच्या निधनामुळे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर दुःखाचे डोंगर कोसळले. कारण या दोघांमुळे प्रेषितांना खूप मोठा आधार होता. हे दोघे निर्वतल्यावर प्रेषित अगदीच एकाकी पडले. अशाप्रसंगी प्रेषितांच्या तीन मुलींपैकी दोन मुली अति शांत स्वभावाच्या. अशाप्रसंगी केवळ फ़ातिमाच (रज़ि.) त्यांना धैर्य देत. अबू तालिब आणि ख़दीजामुळे विरोधकांवर काही अंशी धाक होता. आता मात्र त्यांना मोकळे रान मिळाले. यामुळे प्रेषितत्वाच्या दहा ते तेरा वर्षांपर्यंतची तीन वर्षे अत्यंत कठीण आणि हलाखीची गेली. त्यांच्यावर आणि त्यांच्या अनुयायांवर अमानुष अत्याचार करण्यात आले. मात्र प्रेषित किंचितही न डगमगता सत्याचा प्रचार-प्रसार करीतच होते. अन्याय-अत्याचाराविरुद्ध खंबीरपणे लढत होते, त्यांच्या सत्यांदोलनाच्या तीव्रतेत काहीही फरक पडला नाही.

## प्रकरण सातवे

# प्रेषित मुहम्मदांचा माननीय सौदा (रज़ि.) यांच्याशी विवाह

ख़दीजा (रज़ि.) यांच्या निधनानंतर प्रेषितांच्या मुलींच्या पालनपोषणाचा प्रश्न उभा राहिला. मुलगी फ़ातिमा (रज़ि.) आईच्या छत्रछायेपासून वंचित झालेली होती. तिच्या दोन्ही थोरल्या बहिणींचा विवाह झालेला असल्याने त्यांच्याकडून प्रेषित मुहम्मद (स.) निश्चिंत झालेले होते, मात्र फ़ातिमाच्या संगोपनाची त्यांना चिंता भेडसावत होती. यासाठी त्यांनी एका विधवेशी विवाह केला, अर्थात सौदा (रज़ि.) यांच्याशी माननीय सौदा (रज़ि.) ही एक वयोवृद्ध आणि मायाळु स्त्री होती. सौदाशी विवाह केल्यावर प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या परिवारासंबंधी निश्चित झाले होते. तिने पत्नीच्या नात्याने प्रेषितांची खूप मनोभावाने सेवा केली, मोठ्या प्रेम आणि ममत्वाने फ़ातिमाचे पालनपोषण आणि शिक्षण-प्रशिक्षण केले. तिला सख्या आईच्या मृत्यूची मुळीच जाणीव होऊ दिली नाही. याव्यतिरिक्त ती खूप दानशूर आणि दीन-दलितांची सेवा करणारी स्त्री म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहे.

## प्रकरण आठवे

# दयेचे दूत मुहम्मद (स.) यांचा ताईफ़-दौरा

इस्लाम विरोधकांवर धाक असणारे काका अबू तालिब आणि इस्लाम व प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासाठी आपले सर्वस्व अर्पण करणारी श्रद्धावंत पत्नी ख़दीजा (रज़ि.)! हे दोघे प्रेषितांना सोडून गेल्यानंतर प्रेषित खूप खचून गेले होते. याबरोबरच प्रेषितांवरील अत्याचारात प्रचंड वाढ झाली होती. मात्र सत्याचा संदेश देण्यात प्रेषितांनी कधीच माघार घेतली नाही. मक्का शहरात प्रेषितांना खूप विरोध होत असल्याने त्यांनी सत्यांदोलनाचा मोर्चा 'ताईफ़' कडे वळविला. मक्का शहराच्या अग्नेय भागात पन्नास मैलाच्या अंतरावर असलेले 'ताईफ़' कृषीसंपन्न होते. या शहरावर अमरू बिन उमैरच्या सफ़ी परिवाराचे राज्य होते. अमरूची तीन तरूण मुले, अब्दे यालैल, मसऊद आणि हबीब यांचा शहरावर दरारा होता. तेथील लोक सुखी समृद्ध होते. सर्वत्र खजुरी, द्राक्ष वगैरेंच्या हिरव्यागार बागा डुलत होत्या आणि सुखचैनीची रेलचेल असल्याने लोकांत फाजील अहं वाढलेला होता.

मक्का शहरात सत्याचा स्वीकार न करता उलट विरोधच होत असल्याची दुर्दैवी परिस्थितीचा विचार करून प्रेषितांच्या मनी विचार आला की आपण ताईफ़वासीयांसमोर सत्याचा संदेश देऊ. कदाचित ते इस्लामचा स्वीकार करतील. या विचाराने प्रेषितांनी आपला जीवलग अनुयायी झैद बिन हारिस (रज़ि.) यांस घेऊन ताईफला रवाना झाले.

रस्त्यातच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी बकर आणि क़स्तान परिवारांना इस्लाम सादर केला. मात्र त्यांनी कोणत्याही प्रकारचा प्रतिसाद दिला नाही. त्यामुळे प्रेषित ताईफ़ला पोचले. तेथे सक़ेफी परिवारातील तीन्ही शासनकर्त्यांसमोर इस्लामचा संदेश दिला. मात्र त्यांनी प्रेषितांचा संदेश स्वीकारण्याऐवजी प्रखर विरोध केला. प्रेषितांचा त्यांना खूप संताप चढला, एकेश्वरवाद स्वीकारून मूर्तीपूजा सोडणे त्यांच्याकरिता असहनीय झाले आणि अरब समाजातील प्रसिद्ध असलेला पाहुणचारसुद्धा न करता त्यांनी शहरातील टवाळ मुले प्रेषितांच्या पाठीमागे लावली. ही टवाळ मुले प्रेषितांच्या मागे दगड-धोंडे घेऊन धावत होती. दगडांच्या वारांमुळे प्रेषित रक्तबंबाळ झाले होते. झैद बिन हारिसा (रज़ि.) प्रेषितांच्या सोबत होते. ते टवाळखोरांच्या दगडाचा वर्षाव आपल्या शरीरावर झेलून प्रेषितांचे रक्षण करण्याचा प्रयत्न करीत होते. दोघांची परिस्थिती गंभीर होती. सर्वांगास जखमा झाल्या होत्या. शहराबाहेर आल्यावर कशीबशी त्यांची या निष्ठूर टवाळखोरांपासून सुटका झाली. दोघेही जखमी आणि तहानलेले, थकलेले, व्याकूळ झालेले, शहराबाहेर एका हिरव्या द्राक्षेच्या बागेत त्यांनी आश्रय घेतला. ही बाग मक्का शहरातील रहिवासी उतबा आणि शैबांच्या मालकीची होती. टवाळखोर आता थकून

निघून गेले होते. उतबा आणि शैबा या दोघा भावडांनी या दोघा जखमींना लागून पाहिले आणि आपला नोकर अद्दास ला सांगितले की हे दोघे आपल्या बागेत आश्रित आहेत, म्हणून त्यांना द्राक्षांचे एक घड नेऊन दे ! अद्दस याने एका ताटलीत भरपूर द्राक्षे घेतली आणि प्रेषितांसमोर ठेवली. यावेळी प्रेषित मुहम्मद (स.) हे थकून पहुडलेले होते. माननीय झैद (रज़ि.) त्यांच्या चेहऱ्यावर आणि शरीरावर लागलेले रक्त साफ करीत होते. यानंतर मोठ्या कठीणाईने प्रेषित उठले, जवळच असलेल्या ओहोळ्याच्या पाण्याने हातपाय व चेहरा धुतला आणि ईश्वरासमोर प्रार्थना करताना म्हटले,

"हे ईश्वरा ! हे विश्वाच्या स्वामी ! मी खूप कमकुवत आहे, विवश आहे, लोकांनी मला खूप छळले, अपमानित केले, मात्र याची मी कोणासमोरही तक्रार करीत नाही, केवळ तुझ्यासमोरच आपले दु:ख मांडतो. हे परम दयाळू, परमकृपाळू ईश्वरा ! हे विवश आणि लाचारांच्या समर्थक ईश्वरा ! केवळ तूच माझा स्वामी व पालनकर्ता आहे. हे माझ्या प्रभू ! तू मला कोणाच्या हवाली करीत आहेस? मला छळणाऱ्या परक्याच्या की माझ्यापेक्षा शक्तिशाली असणाऱ्या शत्रूच्या ? असो ! जर तू माझ्याशी नाराज नसशील तर मला मात्र कशाचीच पर्वा नाही. कारण तुझ्या मायेचे छत्र खूप विशाल आहे, तुझ्या अभयाचे क्षेत्र अत्यंत विशाल आहे. मला केवळ तुझाच आश्रय आणि अभय हवा. मग पूर्ण विश्वाचे वैर पत्करावे लागले तरी चिंता नाही. तुझ्या दरबारी केवळ एवढेच मागतो की तू नाराज होऊ नकोस, मी तुझ्या इच्छेवर खूश आणि समाधानी आहे. कारण तुझ्या समर्थन आणि मदतीशिवाय कोणाचेही काही चालत नाही!"

इतक्यात अद्दास ताटातून द्राक्षे घेऊन आला, म्हणाला,

"ही द्राक्षे खा !"

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी "परम दयाळू नि कृपाळू ईश्वराच्या नावाने" म्हणत द्राक्ष तोंडात टाकले. प्रेषितांचे हे शब्द ऐकून अद्दास आश्चर्यचकित झाला. तो ईसाई धर्मीय होता. त्याला प्रेषितांचे हे शब्द आपुलकीचे वाटले. तो आश्चर्याने प्रेषितांना न्याहाळत म्हणाला,

"ईश्वराची शपथ ! या प्रदेशातील रहिवाशांच्या मुखावर यापूर्वी मी कधी असे शब्द ऐकले नाहीत !"

यावर प्रेषित म्हणाले,

"तू कुठला राहणारा आहेस? कोणत्या धर्माचा अनुयायी आहेस?"

"मी ईसाई (ख्रिस्त) धर्माचा अनुयायी असून इराक देशातला आहे !" अद्दास नम्रपणे उत्तरला.

"अरे व्वा ! तर मग तू प्रेषित यूनुस (अ.) यांच्या देशाचा रहिवासी आहेस !" प्रेषितांनी गौरोवोद्गार काढले.

''तुम्ही प्रेषित यूनुस (अ.) यांना कसे ओळखता?'' अद्दासने चकित होऊन विचारले.

''ते माझे बंधु होत. तेही ईश्वराचे प्रेषित होते नि मीसुद्धा ईश्वराचा प्रेषित आहे.''

अद्दास हा ईसाई धर्माचा अनुयायी असल्याने त्यास प्रेषितत्वाची वास्तविकता माहीत होती. प्रेषितामध्ये असणारे गुणधर्म त्यास माहीत होते. हेच गुणधर्म त्यास प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यात दिसले आणि आपोआप त्याच्या मुखावाटे हे शब्द पडले,

''ईश्वराशिवाय कोणीच पूज्य नाही आणि तुम्ही ईश्वराचे दास आणि प्रेषित आहात!''

उतबा आणि शैबा दूरुन हे सर्वकाही पाहत होते. अद्दास परतल्यावर त्यांनी त्यास खडसावतच विचारले,

''तू या दोघा प्रवाशांशी भलतीच श्रद्धा दाखवित होतास ?''

यावर अद्दास उत्तरला, ''आज ज़गाच्या पाठीवर या प्रवाशांपेक्षा जास्त कोणीही महान नाहीत. त्यांनी मला अशा गोष्टीची खबर दिली जी केवळ ईश्वराचा प्रेषितच देऊ शकतो! बाकी ही खबर कोणालाच माहीत नसते !''

दोघा भावंडांनी अद्दासला धमकीवजा म्हटले,''खबरदार ! आपल्या पूर्वजांचा धर्म सोडशील तर ! तुझा धर्म त्या प्रवाशांच्या धर्मापेक्षा चांगला आहे !''

थोडा वेळ विसावल्यानंतर प्रेषित मुहम्मद (स.) आपला जीवलग अनुयायी झैद बिन हारिसा (रज़ि.) याला घेऊन 'नखला' या ठिकाणी पोचले. काही दिवस तेथे काढून 'मुतअम बिन अदी'चे समर्थन घेऊन मक्का शहरी परतले. 'ताईफ' कडून कूच करतेवेळेस प्रेषित मुहम्मद (स.) म्हणाले,

''मी या लोकांच्या उद्ध्वस्ततेस्तव श्राप देऊ इच्छित नाही. मला आपल्या दयाळू व परमकृपाळू ईश्वराकडून आशा आहे की तो त्यांना सुबुद्धी देईल आणि त्यांची पुढील पिढी एकेश्वरवादाला निश्चितच स्वीकार करील.''

प्रेषित मुहम्मद (स.) म्हणत असत, '''ताईफ' च्या दौऱ्याचा दिवस हा माझ्या जीवनाचा सर्वांत जास्त खडतर आणि दु:ख व यातनामय दिवस होता. 'जिब्रील' फरिश्त्याने त्या दिवशी मला विचारले की 'इच्छा असेल तर 'ताईफ' शहरवासीयांना लागलीच उद्ध्वस्त करून टाकतो. मात्र मी नकार दिला. कारण मला आशा आहे की, त्याच्या वंशातील लोक अवश्य एकमेव ईश्वरावर श्रद्धा ठेवतील आणि त्याची उपासना करतील.''

मक्का शहरी आल्यावर त्यांच्या समस्त शरीरावर जखमा झालेल्या होत्या. सर्वांगात मरगळ आलेली होती. शरीरात त्राण उरला नव्हता. घरी परतताच ते अंथरुणावर पहुडले. फ़ातिमा (रज़ि.) यांनी आपल्या पित्याची ही शोचनीय अवस्था पाहिली, त्यांचे काळीज फाटत होते, दु:ख अनावर होत होते. त्यांनी पित्याची मनापासून शुश्रूषा केली.

## प्रकरण नववे

# हिजरत (अर्थात वतनत्याग)

'ताईफ़' च्या दौऱ्यावरून परतल्यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अल्प विश्रांतीनंतर परत जोमाने सत्याचा प्रचार-प्रसार सुरु केला. प्रेषितत्वाच्या दहाव्या वर्षी मदीना शहरातील 'खज़रज' परिवाराची सहा माणसे हज करण्याकरिता मक्का शहरी आली. प्रेषितांचा एकेश्वरवादाचा संदेश त्यांच्या कानी पडला. ती खूप प्रभावित झाली. लागलीच प्रेषितांना (स.) भेटली व इस्लामचा स्वीकार केला आणि मदीनेस परत गेले. दुसऱ्या वर्षी मदीनेतील हजच्या प्रसंगी बाराजणांनी मक्का शहरात प्रेषितांच्या हातावर इस्लाम स्वीकार केला. लगेच तिसऱ्या वर्षी मदीनेतून ७३ स्त्री-पुरुष हजच्या प्रसंगी मक्का शहरी आले आणि प्रेषितांच्या हातावर इस्लाम स्वीकार केला. याप्रसंगी मात्र या ७३ स्त्री-पुरुषांच्या समुहाने प्रेषित मुहम्मद (स.) यांना मदीना शहरी येण्याची विनंती केली. शिवाय प्रेषितांना प्रतिज्ञापूर्वक वचन दिले की, "आपण मदीना शहरी आल्यास आपल्या संरक्षणास्तव आम्ही आपल्या प्राण, संपत्ती आणि सर्वास्वाचे बलिदान देऊ." ही प्रतिज्ञा इस्लामी इतिहासात 'बैते उक़बा' (अर्थात 'उक़बाची प्रतिज्ञा') नावाने प्रसिद्ध आहे. या प्रतिज्ञेनंतरच प्रेषितांनी आपल्या अनुयायांना मदीना शहराकडे स्थलांतराची परवानगी दिली आणि विरोधकांच्या अमानुष व निष्ठूर अत्याचारांनी वैतागलेल्या बऱ्याच अनुयायांनी सरळ मदीना गाठून आश्रय घेतला. काही काळ लोटल्यानंतर स्वत: प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एके रात्री आपले जीवलग अनुयायी आणि जावई माननीय अली (रज़ि.) यांना आपल्या अंथरूणावर झोपवून, माननीय अबू बकर (रज़ि.) यांना सोबत घेऊन मदीनेस रवाना झाले. अर्थात 'हिजरत' केली. याच काळापासून इस्लामी कालनिर्णयाची सुरुवात झाली. मदीना शहरी प्रेषित मुहम्मद (स.) यांचे जंगी स्वागत झाले. मदीनेत विसावल्यावर त्यांनी मस्जिदे नबवीच्या बांधकामाची सुरुवात केली आणि माननीय झैद बिन हारिसा (रज़ि.) यांना मक्केस पाठवून आपल्या परिवारजन आणि हितैषिंना मदीना शहरी घेऊन येण्याकरिता पाचशे दिरहम (तात्कालीन नाणी) आणि दोन उंट देऊन पाठविले. त्यांच्याबरोबर माननीय अबू बकर (रज़ि.) यांनीही आपले सुपुत्र माननीय अब्दुल्लाह (रज़ि.) आणि इब्ने उरीक़त (रज़ि.) यांना आपले परिवारजन मदीना शहरी घेऊन येण्यासाठी मक्का शहरी पाठविले.

त्यामुळे झैद बिन हारिसा (रज़ि.) हे प्रेषितकन्या फ़ातिमा (रज़ि.) अबू बकर (रज़ि.) यांची भार्या माननीय उम्मे ऐमन आणि माननीय उसामा बिन झैद (रज़ि.) यांना मदीना शहरी सुखरूपपणे घेऊन आले. माननीय अब्दुल्लाह बिन अबू बकर (रज़ि.) सुद्धा यांच्याबरोबर आपली माता उम्मे रूमान (रज़ि.), माननीय अस्मा (रज़ि.) आणि आयशा (रज़ि.) यांना सोबत घेऊन आले. प्रेषितांचे परिवारजन मस्जिदे नबवीस लागूनच असलेल्या निवासस्थानी स्थायिक झाले. त्याचप्रमाणे माननीय अबू बकर (रज़ि.) यांच्या परिवारजनांना माननीय हारिसा बिन नुअमान (रज़ि.) यांच्या निवासस्थानी स्थायिक करण्यात आले.

## प्रकरण दहावे

# फ़ातिमा (रज़ि.) यांचा विवाह

हिजरत अर्थात मदीना शहरी स्थलांतराप्रसंगी प्रेषितकन्या फ़ातिमा (रज़ि.) वयात आली होती. काही दिवसांनंतर फ़ातिमाचा विवाह माननीय अली (रज़ि.) यांच्याशी अत्यंत साध्या पद्धतीने पार पडला. याचा तपशील असा आहे.

अनसार (मदीनावासी) आणि मुहाजिरीन (स्थलांतरित) च्या काहीजणांनी माननीय अली (रज़ि.) यांना एकेदिवशी विवाहाप्रकरणी छेडले आणि यासाठी प्रेषितकन्या फ़ातिमाचे नाव सुचविले. माननीय अली (रज़ि.) यांनाही हा प्रस्ताव आवडला. ते प्रेषितदरबारी हजर झाले नि फ़ातिमाशी विवाहाची इच्छा व्यक्त केली. यावर प्रेषितांनीही सानंद होकार दिला आणि माननीय अली (रज़ि.) हर्षोल्हासित होऊन बाहेर पडले. बाहेर मित्रमंडळी अली (रज़ि.) यांची वाट पाहतच होती. अली (रज़ि.) त्यांनी त्यांना प्रेषितांच्या होकाराची खूशखबर दिली. सर्व मित्रांनी त्यांना शुभेच्छा दिल्या. विवाहप्रसंगी माननीय अली (रज़ि.) यांच्याकडे केवळ एक घोडा आणि सामरिक चिलखत एवढीच मोजकी संपत्ती होती. प्रेषितांनी म्हटले की, घोडा युद्धात उपयोगी पडेल, म्हणून चिलखत विकून काही राशी घेऊन या. माननीय अली (रज़ि.) यांनी ते चिलखत विकायला काढले आणि उस्मान (रज़ि.) यांनी ४८० दिरहममध्ये ते विकत घेतले. मात्र खरेदी केलेले चिलखत त्यांनी अली (रज़ि.) यांना परत सप्रेम भेट म्हणून देऊन टाकले. याच काळात प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपली कन्या फ़ातिमास अली (रज़ि.) बरोबर विवाहासंबंधी विचारले आणि तिनेही होकार दिला. ४८० दिरहम घेऊन माननीय अली (रज़ि.) प्रेषितांच्या सेवेत हजर झाले. दोन तृतियांश रक्कमेत सुगंध वगैरे आणि एक तृतियांश रकमेत विवाहस्तव लागणारे साहित्य आणि नवदांपत्यासाठी लागणाऱ्या वस्तू खरेदी करण्याचा प्रेषितांनी त्यांना आदेश दिला. साहित्य खरेदी झाल्यावर प्रेषितांनी अनसार व मुहाजिरीनांना विवाह समारंभात हजर होण्याचे निमंत्रण दिले. सर्व प्रेषितसोबती मस्जिदे नबवीमध्ये जमा झाल्यावर प्रेषितांनी उपस्थित मान्यवरांना संबोधित करून म्हटले,

"हे अनसार (मदीनावासी) व मुहाजिरीन (स्थलांतरित) ! मला ईश्वराने आदेश दिला आहे की मी आपली कन्या फ़ातिमाचा विवाह अली (रज़ि.) यांच्याशी करावा. म्हणून मी या ईश्वरी आदेशाचे पालन तुम्हा सर्वांसमक्ष करीत आहे."

यानंतर त्यांनी खुतब-ए-निकाह (अर्थात विवाहासंबंधी भाषण) दिले, ते या शब्दांत...

"समस्त सृष्टीवर अपार व अनंत अनुग्रह करणाऱ्या त्या परमस्वामी प्रभू ईश्वराचीच स्तुती असो, जो आपल्या असामान्य शक्ती व सामर्थ्यामुळे आराधनेस पात्र आहे. त्याचे शासन सर्वव्यापी, त्याचा आदेश दाही दिशा सर्वत्र. त्याने आपल्या निर्मिती सामर्थ्यातून सृष्टीची निर्मिती केली, आपल्या आदेशाने त्यांना परस्पर विभक्त केले, सत्यमार्ग प्रदान करून प्रतिष्ठेने नावाजले आणि अंतिम प्रेषितांच्या माध्यमाने महिमत्वाच्या शिखरावर विराजमान केले. निश्चितच प्रभु ईश्वराने विवाह अनिवार्य ठरविले आहे. म्हणूनच ईश्वराने म्हटले की, केवळ मीच आपल्या शक्ती आणि सामर्थ्यातून मानवाची निर्मिती पाण्यापासून केली आणि काहींना काहींचे पुत्र, कन्या आणि जावई केले आणि तुझा पालनकर्ता (ईश्वर) महान सामर्थ्यशाली आहे. ईश्वराने प्रत्येक काम केवळ स्वमर्जीनुसारच केले आणि मर्जी व इच्छेची घटका निश्चित असून प्रत्येक मृत्यूकरिता कायदा ग्रंथ आहे."

खुतबा (भाषण) दिल्यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपले जावई माननीय अली (रज़ि.) यांच्याकडे पाहून स्मित हास्य करून म्हटले,

"मी चारशे मिस्काळ (तात्कालीन मोजमाप) मेहेर (वधूभेट) आपली कन्या फ़ातिमा (रज़ि.) हीस तुमच्या विवाहबंधनात देत आहे. तुम्हास मान्य आहे काय?"

"होय ! मला मान्य आहे !" अली (रज़ि.) उत्तरले.

यानंतर प्रेषितांनी दोन्ही वधूवरांच्या यशस्वी जीवनाकरिता ईशदरबारी प्रार्थना केली. मग सर्वच उपस्थितांनी वधू-वरांच्या दांपत्यिक जीवनात सुखशांती व समृद्धीकरिता ईश्वरासमोर प्रार्थना केली.

फ़ातिमा (रज़ि.) आणि अली (रज़ि.) यांचा विवाह हिजरी सन दोनच्या रमझान महिन्यात झाला. लेकीला सासरी पाठविल्याच्या दुसऱ्या दिवशी प्रेषितांनी वलीमा करण्याची (वर पक्षाकडून सस्नेह भोजन करविण्याची) इच्छा व्यक्त केली. माननीय साअद (रज़ि.) यांनी तात्काळ एक बोकड अली (रज़ि.) यांना दिले. काही अनसारजनांनीसुद्धा या कार्यात सहाय्य केले. अली (रज़ि.) यांनी काही खाद्यान्न वस्तु खरेदी केल्या. अशा प्रकारे वलीमाची मेजवानी झाली. या मेजवानीमध्ये पनीर, गव्हाच्या पोळ्या आणि मटन वाढण्यात आले. मुलीस सासरी पाठविताना प्रेषितांनी तिला हृदयास कवटाळले, तिच्या ललाटाचा मुका घेतला आणि तिचा हात अली (रज़ि.) यांच्या हातात देऊन म्हणाले,

"हे अली (रज़ि.) ! प्रेषित कन्येशी विवाहबद्दल तुम्हास शुभेच्छा !" आणि मग फ़ातिमा (रज़ि.) यांना उद्देशून म्हणाले,

"हे फ़ातिमा (रज़ि.) ! तुझा नवरा खूप उत्तम आहे. आता तुम्ही दोघे आपल्या घरी जा, सुखरूप राहा !"

मग नवदांपत्यास पती-पत्नीच्या अधिकार व कर्तव्याची जाणीव करून दिली. मग त्यांना उंटावर स्वार करून निरोप दिला. माननीय सलमान फारसी (रज़ि.) अस्मा बिंत अमीस (रज़ि.) वगैरे नव वधू-वरासोबत गेले.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या लेकीच्या विवाहाप्रसंगी नवदांपत्यास काही वस्तू भेट दिल्या. इजिप्शियन वस्त्राचे एक अंथरून पांघरून, एक लाकडी पलंग, खजूरीची साल भरून तयार केलेल्या उशी, पाण्यासाठी मातीच्या दोन घागरी, एक जाते, दोन चादरी, एक पेला व इतर काही वस्तू या यादीत समाविष्ट होत्या.

माननीय अली (रज़ि.) फ़ातिमा (रज़ि.) यांना घेऊन आपल्या घरी आले. मग प्रेषित मुहम्मद (स.) सुद्धा तेथे पोचले ईश्वरासमोर प्रार्थना केली की,

"हे ईश्वरा ! हे दोघेही मला या जगात सर्वांत जास्त प्रिय आहेत, तूसुद्धा यांच्यावर प्रेम कर आणि यांच्या वंशात खूप वृद्धी प्रदान कर व यांचे रक्षण कर !"

# प्रकरण अकरावे

## नवीन घरात वास्तव्य

फ़ातिमा (रज़ि.) माहेरहून ज्या घरात वास्तव्यास गेल्या अर्थात पतीच्या घरात, ते घर प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या घरापासून थोडे दूरच होते. लेकीला भेटण्याकरिता प्रेषितांना थोडी अडचण येत असे. एके दिवशी त्यांनी म्हटले,

"बाळे ! तुला वारंवार पाहावेसे वाटते. मात्र घर लांब असल्याने व कामाचा व्याप जास्त असल्याने तुला पाहणे शक्य होत नाही. मला वाटते की, तू माझ्या जवळच असावीस."

यावर फ़ातिमा (रज़ि.) म्हणाल्या,

"हे पितावर्य ! आपल्या निवासाच्या अगदी जवळच हारिसा बिन नुअमान (रज़ि.) यांची बरीच घरे आहेत. त्यातील एखादे घर रिकामे असल्यास माझी सोय होईल."

माननीय हारिसा (रज़ि.) हे एक श्रीमंत आणि सज्जन गृहस्थ होते. प्रेषितांच्या इच्छेवर आपले सर्वस्व अर्पण करणारे माननीय हारिसा यांच्या मालकीची बरीच घरे होती. प्रेषित मुहम्मद (स.) मदीना शहरी आले तेव्हा त्यांनी आपली भरपूर घरे प्रेषितांच्या स्थलांतरित आणि बेघर झालेल्या अनुयायांकरिता प्रेषितांच्या सेवेत अर्पण केली होती. मात्र जेव्हा आपली कन्या फ़ातिमा (रज़ि.) हिने स्वत:साठी हारिसांच्या घराची विनंती केली, तेव्हा प्रेषितांनी म्हटले,

"बाळे ! हारिसांकडे घराची विनंती करण्यासाठी मला लाज वाटते. कारण बऱ्याच निराधार आणि बेघर अनुयायांना त्यांनी घरे दिली."

पित्याचे शब्द ऐकून फ़ातिमा (रज़ि.) गुपचुप झाली. मात्र ही कुनकुन हारिसा बिन नुअमान (रज़ि.) यांच्या कानावर गेली. त्यांना गहिवरून आले. जीव कासावीस झाला आणि हृदयात प्रेषितांचे प्रेम व डोळ्यांत करूणामय अश्रु घेऊन धावतच प्रेषितांच्या सेवेत हजर झाले, सहानुभूतींनी ओतप्रोत शब्दांत ते प्रेषितांना म्हणाले,

"हे प्रेषिता (स.)! मला असे कळाले की फ़ातिमाला आपण जवळच्या घरात ठेवू इच्छिता. म्हणून आपल्या शेजारीच असलेले माझे एक घर तात्काळ रिकामे करून देतो. आपण तात्काळ फ़ातिमास बोलावून या घरात ठेवावे. हे ईश्वरांच्या प्रेषिता! माझे तन-मन-धन हे सर्वकाही आपल्यावर ओवाळून टाकतो, ईश्वराची शपथ ! प्रेषितांना जी वस्तू पसंत असेल, ती माझ्याऐवजी प्रेषितांजवळच असलेली मला आवडेल."

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी हारिसांच्या (रज़ि.) या त्यागपूर्ण वर्तनाची मनोमन प्रशंसा केली आणि त्यांच्याकरिता बरकतीची प्रार्थना करून आशीर्वाद दिला.

यानंतर फ़ातिमा (रज़ि.) आणि अली (रज़ि.) हे दांपत्य प्रेषितांच्या शेजारीच असलेल्या घरात स्थायिक झाले.

## प्रकरण बारावे

# दांपत्यिक जीवन

फ़ातिमा (रज़ि.) आणि अली (रज़ि.) यांचे वैवाहिक संबंध खूप मधुर आणि त्यागपूर्ण होते. माननीय अली (रज़ि.) फ़ातिमाच्या इच्छा नि भावनांचा खूप आदर करीत. फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा आपल्या पतीचा खूप आदर करीत. त्यांची प्रत्येक इच्छा व मर्जी सांभाळीत, मनापासून पतीची सेवा करीत. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या लाडक्या कन्येस सदाचार आणि ईशपरायणतेचे बाळकडू लहानपणीच पाजले होते. ते तिला नेहमी म्हणत,

"आपल्या पतीची सेवा करणे हे पत्नीचे सर्वांत मोठे कर्तव्य. प्रत्येक पत्नीने आपल्या पतीच्या आदेशाचे पालन केल्यास दांपत्यिक जीवनात सुख-शांती नांदते."

दुसरीकडे ते माननीय अली (रज़ि.) यांना सुद्धा म्हणत,

"आपल्या पत्नीशी प्रेमपूर्वक वागा. यामुळे तुम्हास निश्चितच स्वर्गानंद प्राप्त होईल, तुमचे दांपत्यिक जीवन सुखी होईल."

प्रेषितांच्या शिकवणींमुळे दोघांचे जीवन असीम प्रेम आणि त्यागाचे प्रतीक होते. अशातलाही प्रकार नव्हे की नवरा-बायकोत कधी थोडीफार कुरबुरसुद्धा होऊ नये. मानवस्वभाव असल्याने नवरा-बायकोत रुसवे-फुगवे होणे स्वाभाविकच होय. मात्र प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या सारख्या हाडाच्या शिक्षकामुळे दोनचार प्रसंगी उद्भवणारे रुसवे-फुगवे पार नाहीसे होत.

एकदा असेच झाले. काहीतरी कारणामुळे फ़ातिमा (रज़ि.) आणि अली (रज़ि.) यांच्यात थोडी कुरबुर झाली. फ़ातिमा (रज़ि.) रुसली, थेट पित्याचे घर गाठले, अली (रज़ि.) सुद्धा तिच्या मागे-मागे प्रेषितांच्या घरी पोचले. फ़ातिमाने वडिलांकडे आपल्या नवऱ्याची तक्रार केली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अगदी शांतपणे मुलीची समजूत काढताना म्हटले,

"बाळे ! तूच बघ, तुझा नवरा किती संयमी आहे. असा कोणता पती असेल, जो गुपचुपपणे आपल्या बायकोच्या मागे येतो ! हे बघ बाळे, जगात असे कोणतेच जोडपे नाही, ज्यांच्यात थोडीफार कुरबुर व रुसवा-फुगवा होत नसतो. असा कुणालाही नवरा मिळालेला नसतो, जो प्रत्येक काम आपल्या बायकोच्याच मर्जीवर करीत असेल किंवा आपल्या बायकोच्या एखाद्या गोष्टीवर नाराज होत नसेल."

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे हे शब्द ऐकून माननीय अली (रज़ि.) म्हणाले,

"ईश्वराची शपथ ! यापुढे फ़ातिमांस न आवडणारे कोणतेही काम करणार नाही."
(संदर्भ : तबक़ात - इब्ने साअद)

अशा रितीने प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दोघांची समजूत काढली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी घराचे कामकाज अली (रज़ि.) आणि फ़ातिमा (रज़ि.) मध्ये वाटून दिले होते. अर्थात घरातील सर्व कामे अर्थात स्वयंपाक, झाडलोट, धान्य दळणे, कपडे धुणे, मुलांचे शिक्षण-प्रशिक्षण वगैरे फ़ातिमाने करावीत आणि घराबाहेरील सर्व कामे अर्थात सामान आणणे, अर्थार्जनाची कामे करणे, उंटांना पाणी पाजणे वगैरे अलींनी करावीत. अशा प्रकारे दोघांचे दांपत्यिक जीवन मोठ्या सुखसमाधानाने व्यतीत होत होते.

एकदा असे झाले इस्लामचा कट्टर विरोधक 'अबू जहल'च्या भावाने अबू जहलची मुलगी 'धोरा बिंत अबू जहल'शी विवाह करण्याचा माननीय अली (रज़ि.) यांना सल्ला दिला. अली (रज़ि.) यांनी सुद्धा होकार दिला. वधू पक्षातील काही बुजूर्ग मंडळीनी प्रेषित मुहम्मद (स.) यांची भेट घेऊन लग्नाची परवानगी मागितली. मात्र प्रेषित खूप नाराज झाले. ते मस्जिदीच्या मेंमरवर चढले, भावूक होऊन म्हणाले,

"अबू जहलचे परिवारजन हे अली बिन अबीतालिब यांचा आपल्या कन्येशी विवाह करू इच्छितात आणि यासाठी ते माझ्याकडे परवानगी मागण्यासाठी आलेत. मात्र मी मुळीच परवानगी देणार नाही. त्यांना त्या मुलीशी जर लग्न करायचेच असेल तर माझ्या मुलीला आधी तलाक द्यावा, मग ते लग्न करायला मोकळे! कारण फ़ातिमा (रज़ि.) ही माझ्या काळजाचा एक तुकडा आहे. ज्याने तिला दु:ख दिले, त्याने जणू मला दु:खी केले."

यानंतर आपली दुसरी मुलगी झैनब (रज़ि.) चे पती अबुल आस (रज़ि.) यांच्याकडे इशारा करीत म्हणाले,

"हासुद्धा माझा जावई! याने मला दिलेला शब्द तंतोतंत पाळला. मी वैधला निषिद्ध करण्यासाठी मुळीच आलेलो नाही. (आणि त्याचा मला ईश्वराने अधिकारही दिलेला नाही.) मात्र शपथ आहे त्या एकमेव ईश्वराची! प्रेषिताची कन्या आणि इस्लामद्रोह्याची कन्या एकत्र येऊ शकत नाहीत."

आदरणीय मुहम्मद (स.) यांच्या अशा भावना पाहून माननीय अली (रज़ि.) यांनी अबू जहलच्या कन्येशी विवाहाचा विचार मनातून काढून टाकला.

एके दिवशी प्रेषित मुहम्मद (स.) लेकीला भेटण्याकरिता आले. मात्र फ़ातिमाच्या घरात त्यांना अली (रज़ि.) दिसले नाहीत.

"अली (रज़ि.) कोठे आहेत ?" प्रेषितांनी फ़ातिमास विचारले.

"आमच्या द्रोघांत कुरबुर झाली, ते नाराज होऊन गेले." फ़ातिमा (रज़ि.) इवलासा चेहरा करून म्हणाली. प्रेषितांनी एका माणसास सांगितले,

"पाहा तर, अली (रज़ि.) कोठे आहेत ते !"

"अली (रज़ि.) मस्जिदमध्ये पहुडले आहेत." तो उत्तरला.

आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) थेट मस्जिदीत पोचले, तेथे अली (रज़ि.) झोपलेले होते. त्यांच्या पायास जमिनीची माती लागलेली होती. प्रेषित मुहम्मद (स.) त्यांच्या पायास लागलेली माती हाताच्या प्रेमळ स्पर्शाने साफ करीत होते, म्हणत होते,

"अबू तुराब ! उठा !!"

माननीय अली (रज़ि.) यांना उठवून त्यांनी फ़ातिमाच्या घरी आणले. अरबी भाषेत अबू तुराब या शब्दाचा अर्थ 'मृतिका-पिता' असा होतो. माननीय अली (रज़ि.) प्रेषितांनी दिलेल्या या उपाधीने सुखावून गेले होते. अली (रज़ि.) 'अबू तुराब' या नावाने ओळखले जाण्यामागे हेच कारण होय. घरी आल्यावर प्रेषितांनी नवरा-बायकोची समजून काढली. बस, केवळ या चारपाच घटना इतिहासात अशा मिळतात, ज्या त्यांच्या दांपत्यिक जीवनात नवरा-बायकोत स्वाभाविक कुरबुरी घडणाऱ्या घटना होत.

एकदा फ़ातिमा (रज़ि.) ला रात्रभर ताप आलेला होता. रात्रभर तापामुळे तिचा डोळा लागला नाही. अली (रज़ि.) मनापासून तिची शुश्रूषा करीत होते. रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी दोघांना झोप लागली. फजर (सकाळ) च्या नमाजीच्या वेळी अली (रज़ि.) यांना जाग अली त्यांनी पाहिले की फ़ातिमा (रज़ि.) नमाज पढण्याकरिता वुज़ू (हात पाय धुण्याची इस्लामी पद्धत) करीत होती. अली (रज़ि.) सुद्धा उठून मस्जिदीत गेले. नमाज पढून परतले. घरी पाहिले तर फ़ातिमा (रज़ि.) जात्यावर धान्य दळत आहे, तिचे कष्ट पाहून अली (रज़ि.) म्हणाले,

"फ़ातिमा (रज़ि.) ! जरा स्वतःवर तरी दया कर ! तुझे शरीर रात्रभर तापाने फणफणत होते. सकाळीच उठून थंड पाण्याने वुजू करून नमाज पढलीस आणि आता जात्यावर दळण दळत आहेस, यामुळे तू जास्तच आजारी पडशील !"

फ़ातिमा (रज़ि.) काम चालूच ठेवून म्हणाली, "कर्तव्य पार पाडताना मेले तरी मला काळजी नाही. वुजू करून नमाज पढून ईश्वराची आज्ञा पाळली आणि दळण दळून तुमची व मुलांची सेवा करीत आहे."

फ़ातिमा (रज़ि.) ही अत्यंत कष्टाळू आणि कर्तव्यनिष्ठ होती. तिने आपल्या कामात कधीही कोणाचीच मदत घेतली नाही. कष्ट करण्यास कधीच घाबरत नसे.

आपल्या पतीसमोर कोणत्याही प्रकारची कधीच तक्रार केली नाही. ती विनातक्रार आणि सतत काम करीत गेली. आधी पती नि मुलांबाळांना जेवू घालायची आणि मगच स्वत: जेवायची.

एकदा अली (रज़ि.) डोक्यावर गवताचा भलामोठा भारा घेऊन आले. फ़ातिमा (रज़ि.) घरात कामात व्यस्त होती. भारा खाली उतरून ठेवायला मदतीसाठी फ़ातिमास हाक दिली. मात्र फ़ातिमास काही क्षण उशीर झाला. अलींनी दणदिशी गवताचा भारा खाली आपटला व म्हणाले,

"फ़ातिमा (रज़ि.), गवताच्या भाऱ्यास हात लावले असते तर झिजली असती का?"

नवऱ्याची नाराजी पाहून फ़ातिमा (रज़ि.) इवलेसे तोंड करून निरागस भावाने म्हणाली,

"तसे नाही हो ! मी कामात व्यस्त होते. म्हणून दोन घटका उशीर झाला. माझे वडील अर्थात ईश्वराचे प्रेषित अशा कामासाठी नेहमी पुढे सरसावतात. मग मी कशी काय मागे-पुढे पाहू?"

फ़ातिमाच्या या उत्तराने अलींना आपले हसू आवरता आले नाही. ते तिचे भोळसर मात्र ज्ञानात्मक उत्तर ऐकून हसतच खोलीत शिरले.

फ़ातिमाच्या याच सवयी आणि वागणुकीने ते खूप प्रभावित होते. तिची मनापासून पती व परिवारजनांची सेवा ते आजन्म विसरु शकले नाहीत. अगदी अंतिम क्षणापर्यंत ते फ़ातिमाची आठवण काढून गहिवरत, म्हणत,

"तिचा हा सेवाभाव, आज्ञाधारकता व निष्ठा मी कधीच विसरु शकत नाही. तिने कधीच मला नाराज केले नाही !"

प्रकरण तेरावे

# फ़ातिमा (रज़ि.) यांचा स्वभाव व वागणूक

फ़ातिमा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या काळजाचा तुकडा, त्यांच्या हृदयाची स्पंदने, त्यांच्या मनाची शांती, त्यांची अत्यंत लाडकी लेक! अगदी बापावरच गेलेली. बापासारखाच चेहरा-मोहरा, चालणे-बोलणे, हसणे, चेहऱ्याचे हाव-भाव अगदी बापासारखेच. स्वभावसुद्धा अगदी बापासारखाच मनमिळाऊ, इतरांच्या दुःखांवर कळवळणारा, बुडत्यास सहारा देणारा. इतरांसाठी कळवळणारे बापासारखेच अंत:करण बापासारखीच डोळ्यांत करूणा आणि ममत्वाचे ओसंडून वाहणारे झरे कारण बापाचीच ती लाडकी लेक! चालणे, हसणे, बोलणे, भावूक होणे सर्वकाही बापाचेच प्रतिबिंब. प्रेषित मुम्मद (स.) यांच्या पत्नी आयशा (रज़ि.) म्हणायच्या,

"बोलण्याची, चालण्याची व वागण्याची तिची पद्धत आणि तिचा स्वभाव चक्क प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासारखाच, चेहरा-मोहरा आणि भावनांही प्रेषितांप्रमाणेच"

आयशा (रज़ि.) यांचे कथन आहे की,

"एके दिवशी आम्ही सगळ्या सवती अर्थात प्रेषितांच्या (स.) भार्या प्रेषितांजवळ बसलो होतो. इतक्यात फ़ातिमा (रज़ि.) आली. तिची चालण्याची ढब अगदी प्रेषितांसारखीच होती. तिला पाहताच प्रेषित मुहम्मद (स.) आनंदाने भारावून गेले, आनंदाच्या भरात बसल्याजागी ताडकन उठले, 'मरहबा या फ़ातिमा' (तुझे हार्दिक स्वागत असो, हे फ़ातिमा) म्हणत प्रेमाने आपल्या जवळ बसविले. मग तिच्या कानात काहीतरी कुजबुजले नि तिला गहिवरून आले, रडू कोसळले. तिला रडताना पाहून प्रेषित परत तिच्या कानात काहीतरी कुजबुजले फ़ातिमाच्या दुःखी चेहऱ्यावर हसू उमटले. प्रेषित मुहम्मद (स.) तेथून गेल्यावर मी तिला म्हणाले, 'हे बघ फ़ातिमा (रज़ि.)! सगळ्या पत्नींना न सांगता प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तुझ्या कानात एक रहस्यमय गोष्ट सांगितली आणि तुझे मन भरून आले, तू रडू लागलीस. मग परत प्रेषितांनी आणखीन एक रहस्य तुझ्या कानात सांगितले आणि तुझ्या चेहऱ्यावर आनंद उमटले, तू हसलीस! तेव्हा तू मला प्रेषितांनी तुझ्या कानात सांगितलेले रहस्य सांगशील काय?' मात्र नकार देताना ती म्हणाली, 'नाही बाई! बापाने सांगितलेले गूढ मी नाही सांगणार! मग जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी या इहलोकाचा निरोप घेतला, तेव्हा मी तिला याबाबतीत परत छेडले नि म्हणाले, हे बघ फ़ातिमा (रज़ि.)! तूं माझी लाडकी लेक नि मी तुझी लाडकी आई! तुझ्यावर माझा अधिकार आहे. म्हणून विचारते की, त्या दिवशी प्रेषितांशी तुझ्या कानात कोणते गूढ सांगितले?' माझी नि फ़ातिमाची (रज़ि.) खूप चांगली गट्टी होती, म्हणून ती

मला म्हणाली, 'होय ! आता सांगायला हरकत नाही. सुरुवातीस प्रेषितांनी माझ्या कानात सांगितले की मी लवकरच या जगाचा निरोप घेणार आहे. आणि त्यांचे हे शब्द ऐकताच माझे दु:ख अनावर झाले, मला रडू कोसळले. मात्र दुसऱ्यादा त्यांनी माझ्या कानात म्हटले की मी परलोकी जीवनात स्वर्गामध्ये स्त्रियांची सरदार असेन, याचा मला अत्याधिक आनंद झाला म्हणून मी हसले.''

फ़ातिमा (रज़ि.) नेहमीच स्पष्ट आणि खरे बोलायची. माननीय आयशा (रज़ि.) तिच्याबद्दल असे गौरवोद्गार काढतात,

''मी फ़ातिमाच्या वडिलांशिवाय (अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशिवाय जास्त खरे व स्पष्ट बोलणारा इतर कोणीची पाहिला नाही.''

## प्रकरण चौदावे

# ईशपरायण फ़ातिमा (रज़ि.)

लहानपणापासूनच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी फ़ातिमास एकेश्वरवाद, ईशपरायणता व सदाचाराचे बाळकडू पाजले, म्हणून ती ईशस्मरणात खूप रमून जात असे. ईश्वरासमोर रात्रभर उभी राहत, नमाज पढत, दयाळू-कृपाळू ईश्वरासमोर दयेची-कृपेची भीक मागत, जनकल्याणास्तव प्रार्थना करीत, भावपूर्ण अंत:करण आणि पाझरणाऱ्या डोळ्यांनी त्याचे स्मरण करीत, दिवसा उपवास ठेवीत, ईशपरयाणतेने तिचे शरीर व अंतरमन थरथरत असे. ती ईश्वरासमोर सदाचार व सद्‌बुद्धीची मागणी करीत. मस्जिदे नबवीस खेटूनच घर असल्याने प्रेषितांच्या शिकवणी तिच्या कानावर पडत, मनावर ठशाप्रमाणे उमटत आणि कृतीमधून व्यक्त होत. प्रेषितांच्या या शिकवणींतून जेव्हा ईश्वराच्या महिमेचा उल्लेख येई तेव्हा भारावून जात, अंतिम निवाड्याच्या दिवशी सर्वांनाच आपापल्या कर्मांचा ईश्वरासमोर हिशेब द्यावयाचा आहे, याचा उल्लेख प्रेषितवचन आणि कुरआनात येताच डोळ्यांतून अश्रुधारा वाहायच्या, सर्वांगाला दरदरून घाम फुटायचा, ती थरथर कापायची, जणू ती अंतिम निवाड्याच्या दिवशी आपल्या कर्मांचा हिशेब देण्यासाठी प्रभु ईश्वरासमोर अक्षरश: उभी आहे.

स्वत: माननीय अली (रज़ि.) म्हणत,

"फ़ातिमाच्या मुखी नेहमी ईश्वराचे स्तवन आणि हृदयी ईश्वराची महिमा असे. ती कामकाज करताना ईशस्तवन करी, जात्यावर धान्य दळताना गीत म्हणण्याऐवजी कुरआनाचे पठण करी."

आणखीन एके ठिकाणी माननीय अली (रज़ि.) कथन करतात की,

"ईश्वराच्या आराधनेत फ़ातिमा (रज़ि.) खूप मश्गूल असायची, मात्र घराच्या कामकाजात काहीच फरक येऊ देत नसे."

फ़ातिमाचे मोठे सुपुत्र हसन (रज़ि.) यांचे कथन आहे की,

"एके रात्री माझी आई नमाज पढण्यासाठी उभी राहिली. रात्रभर नमाज पढत राहिली, मानवकल्याणासाठी ईश्वरासमोर रडून-रडून दयेची यातना केली, मात्र स्वत:साठी काहीच मागितले नाही. अशातच पूर्ण रात्र संपली. मी तिला विचारले, 'काय गं आई ! रात्रभर ईश्वरासमोर सर्वांसाठी प्रार्थना केली, मात्र स्वत:करिता ईश्वरास

काहीच मागितले नाहीस! यावर ती अत्यंत धीरगंभीर स्वरात म्हणाली, 'बेटा ! अगोदर इतरांचा अधिकार नि मग आपला अधिकार !'' (संदर्भ : मदारिजुन् नुबूवत)

हसन बसरी (रह.) यांचे कथन आहे की,

''फ़ातिमा (रज़ि.) इतकी श्रद्धाळू होती की, रात्रभर ईश्वराची आराधना करी, रात्रभर नमाज पढत आणि थकवा व आजारपणातही ईशउपासनेत मन लावीत असे.''

ईश्वराची उपासना, प्रेषित पद्धतीनुसार आचरण हे तिच्या नसानसांत रक्ताप्रमाणे वाहात असे. घरातील कोणत्याही कामास न डावलता ती ईश्वराची भरपूर उपासना करीत असे. म्हणूनच इस्लामी इतिहासात तिचे नाव 'बतूल' म्हणजेच 'ईश्वराची सच्ची उपासिका' प्रसिद्ध पावले.

## प्रकरण पंधरावे

# ज्ञानी व विद्वान फ़ातिमा (रज़ि.)

ज्ञान आणि विद्वत्ता व विवेकांचे भंडार असलेल्या घरात जन्मलेली फ़ातिमा (रज़ि.) ! ज्ञान व विद्वत्ता ही पित्याकडूनच मिळालेली होती. फ़ातिमाने प्रेषित मुहम्मद (स.) यांची एकूण अठरा वचने कथ' केलेली आहेत. तिच्याकडून ही प्रेषितवचने अली (रज़ि.) आयशा (रज़ि.), हसन (रज़ि.), हुसैन (रज़ि.), अनसबित मालिक (रज़ि.), उम्मे हानी (रज़ि.) आणि उम्मे राफे (रज़ि.) यांनी कथन केली.

फ़ातिमाने प्रेषितांकडून कथन केलेल्या वचनांवर आधारित 'मुस्नदे फ़ातिमा (रज़ि.)' ही पुस्तिकासुद्धा 'इमाम दार कुतनी (रह.)' यांनी संपादित केली. तिला साकल्यपूर्ण विचाराचे कौशल्यसुद्धा अवगत होते. एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी फ़ातिमास विचारले,

''स्त्रीचा सर्वांत उत्तम गुणधर्म कोणता?''

परपुरुषास न पाहणे व परपुरुषानेही स्त्रीकडे न पाहणे हा स्त्रीचा सर्वांत उत्तम गुणधर्म !'' फ़ातिमा (रज़ि.) उत्तरली. चाणाक्ष बुद्धी आणि हजरजबाब असलेली फ़ातिमा (रज़ि.) कवनशास्त्रातही पारंगत होती. तिच्या बऱ्याच कवितांचे पर्शियन भाषेत भाषांतरसुद्धा झाले.

## प्रकरण सोळावे

# त्यागी आणि संयमी फ़ातिमा (रज़ि.)

चेहऱ्या-मोहऱ्याप्रमाणेच फ़ातिमा (रज़ि.) यांची वागणूक आणि स्वभावसुद्धा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावरच गेलेला. दानशूरता आणि त्यागाची ती मूर्तीच. इस्लामची विजयी घोडदौड सुरु असताना इस्लामी आंदोलकांचे हलाखीचे दिवस आता संपत आले होते. पराभुतांची बरीच संपत्ती मुस्लिमांच्या हाती येत होती. इस्लामच्या विधानानुसार युद्धात सापडलेल्या संपत्तीचा एक पंचमांश भाग ईश्वर, प्रेषित मुहम्मद (स.), प्रेषितांचे नातलग आणि अनाथ व गोरगरिबांच्या वाट्याला येत. बाकीची ऐंशी हक्के संपत्ती जनसामान्यांत वाटण्यात येई. मात्र प्रेषित मुहम्मद (स.) हे आपल्या वाट्याला आलेली संपत्तीसुद्धा गोरगरिबांत दान करून उपासमारीचे दिवस कंठीत असत. एवढेच नव्हे तर आपल्या सर्व भार्या आणि अत्यंत लाडकी व काळजाचा तुकडा असलेली फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा संपत्तीच्या उपभोगापासून वंचित असे. ते आपल्या या लाडक्या कन्येस नेहमीच अशी शिकवण देत,

"बेटा! संपत्तीवर आपल्या सर्वांपेक्षा जास्त अधिकार दीन-दलित आणि गोरगरिबांचा आहे."

ते मोठ्या कौशल्याने आपल्या या कन्येस त्याग, बलिदान आणि दानशूरतेचे बाळकडू पाजित असत.

एकदा पराभुतांच्या संपत्तीमध्ये काही नोकर व गुलाम प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्राप्त झाले. म्हणून माननीय अली (रज़ि.) यांनी फ़ातिमास म्हटले,

"हे फ़ातिमा (रज़ि.)! जात्यावर दळण दळून-दळून तुझ्या हाताला घट्टे पडलेत. चुलीत फुंकून फुंकून तुझा चेहरा काळवंडला. आज प्रेषितांकडून एखादी सेविका मागून घे !"

फ़ातिमा (रज़ि.) मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर झाली. मात्र मागणी करण्याचा तिचा स्वभावच नव्हता. केवळ इतरांना देण्याचीच तिची मनोवृत्ती होती. वडिलांसमोर मागणी करायची असली तरी तिला याची लाज वाटली आणि काही वेळ गुपचूप बसून तशीच घरी परतली. अली (रज़ि.) यांना सांगून टाकले की नोकराणी मागण्याची माझी एकटीची हिंमत झाली नाही. तुम्ही सोबत आल्यास बरे होईल. म्हणून आदल्या दिवशी दोघे नवरा-बायको मिळून प्रेषितांच्या सेवेत हजर झाले. आपली अडचण सांगून नोकराणी देण्याची विनंती केली. यावर प्रेषित म्हणाले,

"सध्या मी तुम्हाला नोकराणी देऊ शकत नाही. कारण 'असहाबे सुफ्फा' (अर्थात इस्लामकरिता आपले सर्वस्व त्यागणारे निराधारजन) अजून बाकी आहेत. मला त्यांचीही सोय अगोदर करावयाची आहे. ज्या लोकांनी इस्लामखातर आपले घरदार, संपत्ती त्यागून निराधारांचे जीवन कंठिले, उपासमार सहन केली, आधी त्यांच्याकडे पाहावे लागेल, त्यांना कसे विसरता येईल?"

पुढे प्रेषितांनी आपले बोलणे चालू ठेवताना म्हटले,

"बेटा ! बदरच्या युद्धात शहीद झालेल्यांच्या अनाथ मुलांचा तुझ्यापेक्षा जास्त अधिकार आहे. तुझ्यापूर्वी त्यांची सोय करणे भाग आहे."

यानंतर म्हटले,

"बेटा ! तुला ज्या गोष्टीची इच्छा आहे, त्यापेक्षाही उत्तम गोष्ट मी तुला सांगतो, प्रत्येक नमाजीनंतर दहावेळा 'सुबहा नल्लाह' (ईश्वर पवित्र आहे), अल हम्दु लिल्लाह (ईश्वर स्तवनीय आहे) आणि अल्लाहु अकबर (ईश्वर महान आहे) चा जाप करीत जा. हे तुझ्याकरिता नोकराणीपेक्षाही जास्त उत्तम आहे."

बापाची लाडकी नि आज्ञाधारक फ़ातिमा (रज़ि.) आनंदीत होऊन म्हणाली,

"मी ईश्वर आणि त्याच्या प्रेषितांकडून या अवस्थेवर खूप समाधानी आहे."

माननीय अली (रज़ि.) यांचे कथन आहे की, फ़ातिमा (रज़ि.) प्रेषितांच्या या शिकवणीमुळे खूप समाधानी झाली. तिला हुरूप आला नि नव्या जोमाने ती कामात परत व्यस्त झाली.

एकदा फ़ातिमा (रज़ि.) मस्जिदे नबवीमध्ये प्रेषितदरबारी हजर झाली. भाकरीचा एक तुकडा प्रेषितांना खाण्यासाठी पुढे ठेवला. प्रेषितांनी विचारले,

"मुली ! हे कुठून आणलेस?" "पिताजी ! थोडेसे सातू (गव्हाचा एक प्रकार) दळून भाकर केली. मुलांना वाढली, मग विचार आला की, कुणास ठाऊक, पिताजींना अन्न मिळाले की नाही. हे प्रेषिता! शपथ ईश्वराची! दोन वेळच्या उपासमारीनंतर तिसऱ्यांदा ही भाकरी मिळाली होती," फ़ातिमा (रज़ि.) गंभीरपणे म्हणाली.

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तो भाकरीचा तुकडा कसाबसा गळ्यात उतरविला आणि म्हणाले,

"बेटी ! सलग चार वेळच्या उपासमारीनंतर हा पहिला भाकरीचा तुकडा आहे, जो तुझ्या बापाच्या पोटी उतरला."

एकदा फ़ातिमा (रज़ि.) आज़ारी पडली. प्रेषितांना कळताच ते आपल्या एक

अनुयायी इम्रान बिन हिसैन (रज़ि.) यांना सोबत घेऊन आपल्या लाडकीस पाहायला फ़ातिमाच्या घरी पोचले. दारावर पोचून प्रवेशाची परवानगी मागितली. फ़ातिमाने आतूनच प्रेषितांना घरात येण्याची विनंती केली.

"माझ्यासोबत हिसैन (रज़ि.) सुद्धा आहेत." प्रेषितांनी प्रश्नवजा म्हटले.

"पिताजी! ज्याने आपणास प्रेषित करून पाठविले, त्या ईश्वराची शपथ! माझ्याकडे त्यांच्याशी पडदा करण्याइतपत चादर नाही."

फ़ातिमाचे उत्तर ऐकून प्रेषितांनी आपल्या खांद्यावरची चादर आत फेकली. यानंतर हिसैन (रज़ि.) यांना घेऊन प्रेषितांनी घरात प्रवेश केला.

"पिताजी ! आजारपणाने व्यथित आणि भुकेने मी खूप व्याकूळ आहे. तुमच्या मेजवानीकरिता घरात अन्नाचा दाणा पण नाही !" फ़ातिमा (रज़ि.) व्याकूळ स्वरात म्हणाली.

"माझ्या लाडक्या लेकी ! संयम धर ! मीसुद्धा आज तीन दिवसांपासून उपाशी आहे. मी ईश्वरास जे मागतो, ते तो अवश्य देतो. मात्र मी परलोकी सुखाला ऐहिक सुखावर प्राधान्य देतो."

एवढे बोलून प्रेषितांनी फ़ातिमाच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवित म्हटले,

"लाडके ! या जीवनात डोकावणाऱ्या संकटांनी दु:खी होऊ नकोस. परलोकात तू महिलांची प्रमुख असशील."

एकदा अली (रज़ि.) आणि फ़ातिमा (रज़ि.) दोघे नवरा-बायको दोन दिवसांपासून उपाशी होते. घरी खायला अन्नाचा दानाही नव्हता. माननीय अली (रज़ि.) दिवसभर मजुरी पाहत फिरत होते. संध्याकाळी एका व्यापाऱ्याचे सामान उंटावरून उतरविण्याचे काम त्यांना मिळाले. त्यांनी उंटावरून सामान उतरवून दिले. व्यापाऱ्याने त्यांना एक दिरहम (तात्कालीन चलनी नाणे) मजुरी दिली. रात्र बरीच उलटली होती. बाजारातील खाद्यवस्तूंची दुकाने बंद होती. शेवटी एक दुकान उघडे दिसले. माननीय अली (रज़ि.) यांनी एका दिरहमाचे सातू खरेदी केले. घरी फ़ातिमा (रज़ि.) अलींची बऱ्याच वेळेपासून आतुरतेने वाट पाहत होती. अली (रज़ि.) घरी पोचले. त्यांना पाहून फ़ातिमा (रज़ि.) आनंदीत झाली. तिने ताबडतोब जात्यावर दळण दळून चुलीवर भाकरी तयार केल्या. अलींनी जेवण आटोपले. पतीचे जेवण आटोपल्यावरच तिने जेवण केले. अली (रज़ि.) यांना आपल्या आज्ञाधारक पत्नीवर खूप अभिमान वाटला.

"प्रेषितांनी सत्य म्हटले की, फ़ातिमा (रज़ि.) ! तू खरोखरच परलोकी स्त्रियांची सरदार आहेस." फ़ातिमाकडे पाहून ते म्हणाले.

एके दिवशी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या घरी जेवणाची सोय नव्हती. अली (रज़ि.) आणि फ़ातिमाच्या घराचीसुद्धा हीच अवस्था होती. आदरणीय प्रेषित उपाशीपोटी घराबाहेर पडले. रस्त्यात माननीय अबू बकर (रज़ि.) आणि माननीय उमर (रज़ि.) भेटले. योगायोगाने हे दोघेही दिवसभरापासून उपाशीच होते. प्रेषित दोघांना घेऊन आपले अनुयायी अबू अय्यूब अन्सारी (रज़ि.) यांच्या घरी पोचले. याप्रसंगी ते आपल्या घराजवळच असलेल्या बागेत खजुरी वेचत होते. प्रेषित आपल्या सहकाऱ्यांसह आपल्या घरी आल्याची चाहूल लागताच त्यांनी गोड खजुरींचा गुच्छा तोडून पाहुण्यांसमोर ठेवला. तात्काळ एक शेळी कापली. कबाब आणि कोरड्यास तयार करून प्रेषित आणि त्यांच्या दोन सहकाऱ्यांसमोर जेवण वाढले. प्रेषितांनी एका भाकरीवर थोडेसे मटन ठेवून म्हटले,

"हे फ़ातिमास द्या. तीसुद्धा उपाशीच आहे."

माननीय अबू अय्यूब अन्सारी (रज़ि.) यांनी ते घेऊन फ़ातिमास पोचविले. प्रेषित मुहम्मद (स.) यांना आपल्या सहकाऱ्यांसह जेवण करताना गहिवरून आले आणि म्हणाले,

"ईश्वराने म्हटले आहे, अंतिम निवाड्याच्या दिवशी मानवाकडून अशा या प्रत्येक अनुग्रहाचा जाब विचारण्यात येईल. (अर्थात ही अनुग्रहे प्राप्त केल्यावर तुम्ही ईश्वरी नियमांचे पालन किती प्रमाणात केले, याच जाब विचारण्यात येईल.)"

फ़ातिमाचे कथन आहे, एके दिवशी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माझ्याकडे येऊन विचारले,

"माझे दोन्ही चिरंजीव कोठे आहेत? (अर्थात हसन व हुसैन)"

मी म्हटले, "अब्बा हुजूर ! सकाळी घरामध्ये खायला अन्न नसल्याने अली (रज़ि.) यांनी सांगितले, मी दोघांना सोबत घेऊन एका यहूदी (ज्यू) कडे (मजुरीकरिता) घेऊन जातो. अन्यथा तुझ्याजवळ असताना ते खायला मागतील व रडतील."

फ़ातिमाचे हे शब्द ऐकताच प्रेषित अलींकडे पोचले. दोन्ही मुले एका हौदाजवळ खेळत होती. जवळच काही खजुरी ठेवलेल्या होत्या. प्रेषित अलींना म्हणाले,

"उन्ह वाढण्यापूर्वीच या दोन्ही मुलांना (हसन व हुसैन) घेऊन घरी पोचा. उन्हाची तीव्रता वाढत आहे."

यावर अली (रज़ि.) म्हणाले,

''हे प्रेषिता! घरात आज सकाळी जेवणाची व्यवस्था नव्हती. थोडा वेळ थांबा. झाडावरून पडलेल्या काही खजुरी फ़ातिमासाठीही वेचून घेतो.''

मग प्रेषित मुहम्मद (स.) थोडावेळ तेथेच थांबलेत. अलींनी खजुरींची गाठोडी बांधली आणि दोन्ही मुलांपैकी एकास कडेवर घेतले. एकास प्रेषितांनी कडेवर घेतले व घरी पोचले. (संदर्भ : तिबरानी)

स्वत: माननीय अली (रज़ि.) यांचे कथन आहे की, ''एकदा बऱ्याच दिवसांपासून घरी खाण्यापिण्याची योग्य व्यवस्था नव्हती. प्रेषितांकडेही आर्थिक चणचण होती. याच काळात मी एके ठिकाणी जात होतो. रस्त्यात मला एक दीनार (तात्कालीन चलनी नाणे) पडलेले दिसले. काहीवेळ विचार केला की हे उचलावे की नाही. शेवटी मी ते नाणे उचलले. कारण मी खूपच आर्थिक तंगी सोसत होतो. मी ताबडतोब एका दुकानावर जाऊन पीठ खरेदी केले. घरी येऊन फ़ातिमास सांगितले की, या पिठाच्या भाकरी कर. तिने पीठ तिबायला सुरुवात केली. सतत उपासमारीमुळे तिची कंबर वाकली होती. तिने ताबडतोब भाकरी केल्या. मग मी प्रेषितांच्या सेवेत हजर झालो नि सगळी कथा सांगितली. प्रेषितांनी हे ऐकल्यावर म्हटले,

''हे अली (रज़ि.) ! ती भाकर खा. ईश्वराने तुम्हास ही उपजीविका प्रदान केली आहे.'' (संदर्भ : अबू दाऊद)

एके दिवशी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) फ़ातिमास भेटायला तिच्या घरी पोचले. यावेळी फ़ातिमाच्या अंगावर उंटाच्या चामडीचा पोषाख होता. त्यातही तेरा ठिगळे लागलेली होती. ती भाकरी करण्यासाठी पीठ तिबत होती. तिच्या मुखावर ईश्वराचे स्तवन होते. तिची ही अवस्था पाहून प्रेषितांचे डोळे पाणावलेत, म्हणाले,

''फ़ातिमा (रज़ि.)! इहलोकातील या संकटावर संयमाने मात कर आणि परलोकात मिळणाऱ्या अविनाशी आनंदाची प्रतीक्षा कर. ईश्वर तुला याचे चांगले फळ देईल.''

## प्रकरण सतरावे

# दयाळू आणि दानशूर फ़ातिमा (रज़ि.)

एकदा सलीम परिवारातील एका वृद्ध गृहस्थाने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हातावर इस्लाम स्वीकारला. प्रेषितांनी त्यांना इस्लामचे काही नियम सांगून विचारले,

"तुमच्याकडे काही संपत्ती वगैरे आहे काय?"

यावर ते वृद्ध गृहस्थ उत्तरले,

"हे ईश्वराच्या प्रेषिता! ईश्वराची शपथ, सलीम कबिल्यातल्या तीन हजार लोकांपैकी मीच सर्वांत जास्त गरीब व्यक्ती आहे."

प्रेषितांनी आपल्या अनुयायांकडे पाहून म्हटले,

"तुमच्यापैकी कोण या गरिबाची मदत करण्यास तयार आहे?"

यावर माननीय साअद बिन उबादा (रज़ि.) ताडकण उठून म्हणाले,

"हे प्रेषित! मी माझी सांडणी यांना देऊन टाकतो."

मग प्रेषितांनी म्हटले,

"तुमच्यापैकी कोण यांचे शिर झाकण्यास तयार आहे?"

यावर माननीय अली (रज़ि.) उठले आणि आपल्या डोक्यावरील पगडी या वृद्ध गृहस्थांच्या शिरी चढविली. मग परत प्रेषितांनी विचारले,

"तुमच्यापैकी कोण यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करण्यास तयार आहे?"

यावर माननीय सलमान फारसी (रज़ि.) यांनी त्यांना आपल्या सोबत घेतले आणि काही घरांवर जाऊन मागणी केली. मात्र कोठेच काही सापडले नाही. शेवटी ते फ़ातिमाच्या घरी पोचले, फ़ातिमाने विचारल्यावर त्यांनी पूर्ण हकीगत सांगितली आणि म्हणाले,

"प्रेषितांच्या कन्ये ! या गरिबाच्या खाण्याचा बंदोबस्त कर."

त्यांची अवस्था ऐकून फ़ातिमाचे दयाळू काळीज कळवळले. तिला गहिवरून आले नि म्हणाली,

"सलमान (रज़ि.)! आज आमच्या घरीसुद्धा तीन दिवसांपासून खाण्याची व्यवस्था नाही. दोन्ही मुले उपाशी झोपलीत. मात्र याचकास रिकाम्या हाती परत करणे योग्य नाही." मग तिने आपली चादर सलमान (रज़ि.) यांना देऊन म्हटले,

"ही चादर घेऊन शमऊन ज्यूकडे जाऊन विका आणि यांच्या पोटापाण्याची व्यवस्था करा."

सलमान फारसी (रज़ि.) फ़ातिमाची चादर घेऊन 'शमऊन'कडे पोचले आणि सगळी हकीगत सांगितली. ही हकीगत ऐकून शमऊन अवाक झाला. काय करावे ते त्यास सुचेनासे झाले. तो आश्चर्याने विचारात गढून गेला. जगात असे लोकसुद्धा

आहेत जे स्वत: उपाशी राहून इतरांच्या पोटा-पाण्याची व्यवस्था करतात, असा त्याच्या मनी विचार आला. फ़ातिमाच्या या त्यागी आणि दानशूर स्वभावाने तो इतका प्रभावित झाला की नकळत त्याच्या मुखावाटे शब्द बाहेर पडले,

"हे सलमान (रज़ि.) ! ईश्वराची शपथ, याच लोकांविषयी 'तौरेत' (ज्यूंचा धर्मग्रंथ) मध्ये ईश्वराची भविष्यवाणी आहे ती आज माझ्या डोळ्यांदेखत तंतोतंत खरी ठरली. तू साक्षी राहा की फ़ातिमाचे पिता आदरणीय मुहम्मद (स.) ईश्वराचे सच्चे प्रेषित असण्यावर आज मला पूर्ण विश्वास बसला. मी त्यांच्यावर सच्च्या अंत:करणाने श्रद्धा ठेवतो."

असे बोलताना त्यास गहिवरून आले. त्याने ताबडतोब काही धान्य सलमान (रज़ि.) यांना दिले आणि फ़ातिमाच्या त्या चादरीकडे मोठ्या आदरभावाने पाहिले. ती चादर सलमान (रज़ि.) यांना परत केली. सलमान (रज़ि.) ते धान्य घेऊन फ़ातिमाकडे आले. फ़ातिमाने ताबडतोब ते धान्य दळून त्या वृद्ध ग्रहस्थांसाठी भाकरी तयार केल्या. इतक्यात सलमान (रज़ि.) म्हणाले,

"हे प्रेषितांच्या दयाळू कन्ये ! थोडेसे अन्न आपल्या मुलांसाठीही ठेव."

मात्र फ़ातिमा (रज़ि.) म्हणाली,

"सलमान (रज़ि.) ! जी वस्तू मी ईशमार्गात दान म्हणून समर्पित केली, ती परत घेणे माझ्याकरिता वैध ठरणार नाही."

सलमान (रज़ि.) त्या भाकरी घेऊन प्रेषितांच्या सेवेत हजर झाले. प्रेषितांनी त्या भाकरी त्या वृद्ध गृहस्थांस दिल्या आणि मग फ़ातिमाच्या घरी गेले. तिच्या डोक्यावर प्रेमाने हात फिरविला आणि आकाशाकडे पाहून म्हणाले,

"हे ईश्वरा ! फ़ातिमा (रज़ि.) तुझी भक्त आहे. तू हिच्यावर प्रसन्न राहा !"

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रज़ि.) यांचे कथन आहे की, एकदा माननीय अली (रज़ि.) यांनी रात्रभर एका बागेस पाणी देण्याचे काम केले. सकाळी बागेच्या मालकाने थोडे धान्य मजुरी म्हणून त्यांना दिले. फ़ातिमाने काही धान्य दळून स्वयंपाक केला. जेवायला बसताच दारावर एका याचकाने हाक दिली, "मी उपाशी आहे !" फ़ातिमाने सगळे अन्न त्यास दान केले. मग उरलेले धान्य दळून परत स्वयंपाक केला. अजून स्वयंपाक तयार झालाच की परत एका याचकाने दारावर हाक दिली, तिने तयार केलेले जेवण परत याचकास दान केले. आणखीन थोडेसे धान्य शिल्लक होते. फ़ातिमाने ते धान्य दळून परत स्वयंपाक केला की परत दरवाज्यावर एका मूर्तीपूजक कैद्याने हाक दिली. तिने हे जेवणसुद्धा त्या कैद्यास दान केले. या दिवशी घरात सगळेच उपाशी राहिले. ईश्वराला त्यांची ही भक्तीपूर्ण दानशूरता इतकी आवडली की त्यांचे गुणधर्म कुरआनात अशारितीने प्रशंसित झाले,

"आणि ते ईशमार्गात गरीब, अनाथ आणि कैद्यांना जेवू घालतात."

(संदर्भ : सूरह-ए-दहर)

माननीय हसन (रज़ि.) (अली (रज़ि.) यांचे ज्येष्ठ सुपुत्र) कथ करतात, एके दिवशी आम्हाला एका वेळचे जेवण करण्याची सोय नव्हती. त्या दिवशी आम्ही उपाशीच होतो. कसेबसे संध्याकाळी जेवण मिळाले. मी, हुसैन आणि वडील जेवले होतो. आई (फ़ातिमा (रज़ि.)) अजून जेवली नव्हती. आमचे सर्वांचे जेवण आटोपल्यावर ती जेवायला बसली, इतक्यात दारावर एका याचकाने साद घातली,

''हे प्रेषितांच्या कन्ये ! मी दिवसभराचा उपाशी आहे, मला जेवायला वाढ !''

आईने (फ़ातिमाने (रज़ि.)) आपले जेवण थांबवून मला सांगितले,

''जा हे जेवण याचकास देऊन ये मी तर एकदाचीच उपाशी होते, बिचारा दिवसभराचा उपाशी आहे !''

मी ते अन्न याचकास नेऊन दिले.

## प्रकरण अठरावे

# स्त्रीची लाज-मर्यादा

फ़ातिमा (रज़ि.) अगदी काटेकोरपणे पडद्याचे नियम पाळायची. स्त्रीस्वभावास साजेल तशीच वागायची. एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तिला बोलावले. ती प्रेषितांसमोरही लाजतच हजर झाली.

एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तिला विचारले,

''माझ्या लाडक्या लेकी ! स्त्रीचा सर्वांत उत्तम गुणधर्म कोणता आहे ?''

''कोणत्याही परपुरुषास जाणूनबुजून न्याहाळू नये आणि कोणत्याही परपुरुषास पाहू देऊ नये. हा स्त्रीचा सर्वोत्तम गुणधर्म आहे,'' ती उत्तरली.

प्रेषित मुहम्मद (स.) एकदा फ़ातिमाच्या घरी गेले, सोबत उम्मे मकतूम (रज़ि.) सुद्धा होते. मात्र ते अंध होते. त्यांना पाहून फ़ातिमा (रज़ि.) तात्काळ पडद्याआड झाली. उम्मे मकतूम निघून गेल्यावरच फ़ातिमा (रज़ि.) आडोशाच्या बाहेर आली. प्रेषित (स.) म्हणाले,

''लेकी ! उम्मे मकतूम (रज़ि.) तर अंध आहेत. तू आंडोशात का गेलीस?''

यावर फ़ातिमाने (रज़ि.) उत्तर दिले,

''ते अंध असले तरी मी तर अंध नाही !''

ती इतकी लाजाळू होती की मेल्यावर डोलाऱ्यातील स्त्रीसुद्धा कोणास दिसू नये, असे तिला वाटे. म्हणूनच आपल्या निधनापूर्वी तिने सूचना केली होती की,

''माझे निधन झाल्यावर माझे अत्यसंस्कार रात्रीच्यावेळी करण्यात यावे, माझ्या डोलाऱ्यावर खजुरीची पाने टाकून मला व्यवस्थित झाकावे, जेणेकरून कोणाची माझ्यावर नजर पडता कामा नये.''

तिचा अंत्यविधी तिच्या या अंतिम सूचनेनुसारच करण्यात आला.

## प्रकरण एकोणिसावे

# दयाभावी फ़ातिमा (रज़ि.)

परम दयाळू प्रेषित मुहम्मद (स.) यांचीच ती कन्या. बापाचा गुणधर्म तिच्यात आला नसेल तर नवलच. मानवाप्रती दया आणि स्नेहाने तिचे अंत:करण ओतप्रोत भरलेले होते. ती अत्यंत व्यस्त स्त्री होती. घरदार सांभाळणे, मुलांवर योग्य संस्कार करणे, पतीची मनोभावे सेवा करणे, ईश्वराची उपासना करणे, यातूनही वेळ काढून ती मानव सेवा करी. कारण प्रेषितांनी म्हटले,

''मानवांची सेवा करणारी व्यक्तीच सर्वोत्तम होय!''

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी पाजलेल्या या बाळकडूचा प्रभाव तिच्या संपूर्ण जीवनावर दिसून येतो. प्रेषितांच्या या कथनानुसार ती प्रत्येक क्षणी इतरांच्या हाकेस प्रतिसाद देत राहिली. तिच्या दारावरून कोणताही याचक कधीच रिकाम्या हाती परत गेला नाही. इतरांचे दु:ख तिला कधीच पाहवत नसे. ती दीन-दलितांसाठी आणि अनाथ व पामरासाठी सतत झटत राहिली. शेजारी-पाजारींच्या सुख-दु:खात नेहमीच तिने मोलाचा वाटा उचलला. मानव-सेवा हे प्रत्येकाचे कर्तव्य असल्याचे ती कधीच विसरली नाही.

तिच्या शेजारी एक 'ज्यू' राहत असे. तो इस्लामचा कट्टर विरोधक होता. मात्र ईश्वराने त्यास सद्‌बुद्धी दिली नि त्याने इस्लामचा स्वीकार केला. मात्र इस्लाम स्वीकारल्यावर त्याच्या नातलगांनी त्यास समाज-बहिष्कृत केले. तो एकाकी पडला. त्यावर आर्थिक संकट आले. तो उपासमारीचे जीवन कंठू लागला. याच काळात त्याची निगा राखणारी पत्नीही वारली आणि जणू तो अडचणींच्या खोल गर्तेत कोसळला. अशा नाजुक प्रसंगीसुद्धा त्याचा एकही नातलग त्याच्या जवळ फटकला नाही. पत्नीच्या अंत्यविधीसाठीची सुविधा करणेही त्यास शक्य नव्हते. फ़ातिमास त्याची अवस्था समजली आणि ती त्याच्या मदतीस धावली. स्वखर्चाने त्याच्या बायकोच्या अत्यसंस्काराची सोय केली.

एकदा धान्य दळताना फ़ातिमाच्या कानावर शेजारून आवर्त किंकाळी आली. दळण सोडून आपल्या नोक़राणीस घेऊन ती शेजारी धावली. शेजारणीस प्रसुती-वेदना होत होत्या. बिचारीच्या जिवावर बेतलें होते. तिचे परिवारजन चिंतातूर झालेले होते. फ़ातिमाने सर्वांचे सांत्वन केले. मग त्या बाईची स्वत:हून व्यवस्थित शुश्रूषा केली. तिला मूल झाले. तिचा जीव धोक्यातून बाहेर काढला. प्रसुती आटोपून आनंदाने फ़ातिमा (रज़ि.) घरी परतली. शेजारीणीच्या सेवेची संधी मिळाल्याचे समाधान व आनंद तिच्या ललाटी चमकत होते. अशी बरीच उदाहरणे फ़ातिमासंबंधी इतिहासात सापडतात.

## प्रकरण विसावे

# प्रेषितांची आज्ञाधारक फ़ातिमा (रज़ि.)

फ़ातिमा (रज़ि.) मुस्लिम होती. अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांची अनुयायी, शिवाय त्यांची लाडकी लेक अशा दोन्ही नात्यांनी ती प्रेषितांची प्रत्येक आज्ञा व आदेश काटेकोर पाळत असे. कारण प्रेषितांच्या आदेशांचे पालन हा श्रद्धेचाच भाग असल्याचे तिला चांगलेच ठाऊक होते. ती आपले प्रत्येक कार्य मनापासून पार पाडायची. प्रेषितांचे अनुकरण अगदी तंतोतंत करायची. ज्याप्रमाणे भुकेल्या पोटास अन्न आणि तहानलेल्या जिवास पाणी मिळाल्यास समाधान व तृप्ती मिळते, त्याचप्रमाणे प्रेषितांच्या आदेशांचे पालन आणि अनुकरण केल्यास तिच्या आत्म्यास समाधान व तृप्ती मिळत असे.

एकदा माननीय अली (रज़ि.) यांच्या हाती काही रक्कम आली. त्यांनी आपल्या फ़ातिमासाठी एक सोन्याचा हार खरेदी केला. प्रेषित मुहम्मद (स.) यांना ही बातमी कळताच ते फ़ातिमाच्या घरी पोचले, म्हणाले,

"फ़ातिमा (रज़ि.) ! प्रेषिताच्या मुलींच्या गळ्यात आगीचा हार आहे, असे लोक म्हणतील तर तुला आवडेल काय? प्रेषिताच्या मुलीस गर्व चढला नि ती सोन्याचा हार वापरू लागली, असे लोकांनी म्हटले तर तुला कसे वाटेल?"

प्रेषितांचे हे शब्द कानावर आदळताच तिने तो हार गळ्यातून असा काढला, जणू तो विस्तवाचा हार आहे नि तिला अक्षरश: त्याचे चटके बसलेत. तिने तो सोन्याचा हार विकला. एक माणूस गुलामगिरीचे खडतर जीवन कंठित होता. हार विकून मिळालेले पैसे गुलामाच्या मालकास देऊन गुलामास मुक्त केले. बिचाऱ्या गुलामाने तिला आशीर्वाद दिला.

इस्लाममध्ये स्त्रियांकरिता सोन्याचे दागिने वापरायची पूर्णपणे परवानगी असूनदेखील प्रेषितांनी स्वत:च्या परिवारजनांना चंगळवाद आणि भौतिक समाधानापासून दूर राहण्याचीच शिकवण दिली. फ़ातिमा (रज़ि.) आपल्या प्रेषित वडिलांच्या प्रत्येक मर्जीचे असेच काटेकोर पालन करीत.

एकदा माननीय अलींनी काही रक्कम फ़ातिमाकडे पाठविली. या काळात प्रेषित मुहम्मद (स.) युद्ध मोहिमेवर गेलेले होते. ते परत मदीना शहरी येत असल्याची खबर मिळताच त्यांच्या स्वागताकरिता अलींनी पाठविलेल्या रकमेतून फ़ातिमाने घराच्या दरवाजावर नक्षीकाम केलेला पडदा लावला. तसेच मुलांसाठी चांदीचे कंकण खरेदी

केले. प्रेषित मुहम्मद (स.) मदीनेत परतल्यावर सवयीप्रमाणे आधी फ़ातिमाच्या घरी आले. मात्र घरावर नक्षीकाम केलेला पडदा पाहताच त्यांची पावले जागीच थबकली फ़ातिमाने मोठ्या आनंदाने प्रेषितांचे स्वागत केले. मात्र दरवाजावर नक्षीकाम केलेला पडदा आणि मुलांच्या हातात चांदीच्या मनगटी पाहून त्यांची पावले जागीच थबकली, ते उलट्या पावलांनी फ़ातिमाच्या घरात प्रवेशही न करता परतले. फ़ातिमास प्रेषितांच्या नाराजीचे खूप दुःख झाले. ती मुसमुसून रडली. ती विचार करू लागली की प्रेषितांच्या मर्जीविरुद्ध कोणती बाब आपल्याकडून घडली. विचार करताना तिला जाणवले की घराच्या दरवाजावरील नक्षीकाम केलेला पडदा आणि मुलांच्या हातातील चांदीच्या मनगट्या, एवढाच घराच्या स्थितीत बदल झालेला आहे. ती ताडकन उठली. दरवाजावरील नक्षीदार पडदा नि मुलांच्या हातातील चांदीच्या मनगटी काढल्या. आपल्या दोन्ही मुलांजवळ (अर्थात हसन व हुसैन) पडदा व मनगटी देऊन म्हणाली,

"हे आजोबांकडे (प्रेषितंकडे) घेऊन जा नि सांगा की या वस्तूंची आपल्या मर्जीने विल्हेवाट लावावी!"

मुले या वस्तू घेऊन आजोबांच्या सेवेत हजर झाली आणि आईचा (फ़ातिमाचा) संदेश दिला. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी आपल्या दोन्ही नातवांना उराशी कवटाळले, प्रेमाने मुके घेतले, आपल्या दोन्ही मांड्यावर दोघांना बसविले. मग त्यांच्याकडून पडदा आणि चांदीच्या मनगट्या घेतल्या. फ़ातिमाचा निरोप ऐकून अत्यानंदाने त्यांचे डोळे पाणावले. त्यांनी आपल्या एका अनुयायास आदेश दिला की या वस्त्रापासून माझ्या गरीब अनुयायांना पोषाख तयार करून द्या आणि या चांदीच्या मनगटीपासून त्यांच्या पोटापाण्याची व्यवस्था करा. मग त्यांनी आपले हात उंचावून ईश्वरदरबारी पाझरत्या नयनांनी प्रार्थना केली,

"हे परमस्वामी ईश्वरा! माझी लेक फ़ातिमावर आपल्या प्रसन्नतेची फुले उधळ. माझ्या गरीब अनुयायांना आणि पामरांना फ़ातिमाच्या ज्या पडद्यामुळे शरीर झाकण्यासाठी वस्त्रे मिळाली, याच्या बदल्यात तू फ़ातिमास स्वर्गामध्ये वस्त्रे प्रदान कर. ज्या चांदीच्या मनगटीपासून माझ्या गरीब व पामर अनुयायांची मदत झाली, त्या मोबदल्यात तिला स्वर्गात उत्तम आभूषणे प्रदान कर!"

फ़ातिमास आपल्या प्रेषित पित्याच्या मर्जीचे नेहमी स्मरण असे. तिने प्रेषितांचे मनापासून जन्मभर अनुकरण केले. याची असंख्य उदाहरणे इस्लामी इतिहासात आढळतात.

## प्रकरण एकविसावे

# बाप-लेकीतील प्रेम

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे फ़ातिमावर जिवापाड प्रेम होते. तिचेही आपल्या वडिलांवर खूप प्रेम होते. प्रेषितांचे सेवक माननीय अनस बिन मालिक (रज़ि.) यांचे कथन आहे,

"मी आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासारखे कोणालाच आपल्या मुलांशी प्रेम असलेले पाहिले नाही."

प्रवासावर किंवा एखाद्या मोहिमेवर जाण्यापूर्वी प्रेषित मुहम्मद (स.) आपल्या या लाडकीस भेटून जात आणि परतल्यावरसुद्धा सर्वप्रथम ते फ़ातिमाचीच भेट घेत.

आयशा (रज़ि.) यांचे कथन आहे,

"जेव्हा फ़ातिमा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांना भेटण्यास्तव येत तेव्हा प्रेषितांचे काळीज आनंदाने उचंबळून येत असे. ती येताच ते ताडकन उभे राहत, तिच्या ललाटाचे चुंबन घेत आणि मग मोठ्या प्रेमाने तिला आपल्या जागेवर बसवित. त्याचप्रमाणे जेव्हा प्रेषित फातिमास भेटण्यासाठी जात, तेव्हा तिचाही आनंद गगनात मावत नसे. प्रेषितांचे आगमन होताच तीसुद्धा उठून उभी राहायची, त्यांच्या ललाटाचे चुंबन घ्यायची आणि मोठ्या आदर व प्रेमाने आपल्या जागेवर बसवायची."

(संदर्भ : हदीस संग्रह - अबू दाऊद)

प्रेषित मुहम्मद (स.) दररोज आपल्या या लाडकीची खबरदारी घेत. तिला एखादी अडचण आल्यास ती दूर करीत. प्रेषितांच्या घरी चणचण असली की फ़ातिमाच्याही घरी चणचण आहे. प्रेषितांच्या घरी एखादा खाद्यपदार्थ तयार झाला की प्रेषित त्यातून आपल्या या लाडक्या लेकीसही आवश्य पाठवित. एखाद्या ठिकाणाहून काही खाण्याची वस्तू आली तर त्यातूनही प्रेषित तिला अवश्य पाठवित. एखाद्या ठिकाणाहून वस्त्रे वा एखादी वस्तू आल्यास प्रेषित त्यातून काही वस्तु फ़ातिमास पाठवित.

माननीय अबू सालबा (रज़ि.) यांचे कथन आहे,

"एकदा प्रेषित मुहम्मद (स.) एका युद्ध मोहिमेवरून परत आले. मस्जिदमध्ये दोन रकअत नमाज अदा करून नित्य-नियमांप्रमाणे फ़ातिमास भेटण्यासाठी गेले. त्यांच्या स्वागतप्रित्यर्थ फ़ातिमा (रज़ि.) घराच्या दरवाजापर्यंत आली आणि प्रेषितांना मिठी मारून मुसमुसून रडली. प्रेषितांनी विचारले,

"लेकी ! का बरे रडतेस?"

म्हणाली,

"नित्य कष्ट करता-करता तुमच्या चेहऱ्याचा रंग पांढरा फट पडला. तुमच्या अंगावरील फाटलेले वस्त्र आणि दयनीय अवस्था पाहून मला रडू आले !"

ती रडत-रडतच म्हणाली. तिच्या रडण्याने प्रेषितांनाही गहिवरून आले. तिचे सांत्वन करताना म्हणाले,

"लेकी! दुःखी होत जाऊ नकोस. तुझ्या बापाला ईश्वराने एका अशा कार्यासाठी पाठविले की समस्त भूतलावरील प्रत्येक घरात सत्यधर्म (इस्लाम) पोचवावा आणि हा धर्म तिथपर्यंत पोचेल जिथपर्यंत सूर्याची किरणे पोचतात."

(संदर्भ : तिबरानी, हाकिम)

माननीय अनस बिन मालिक (रज़ि.) यांचे कथन आहे,

"एकदा फ़ातिमास माहीत झाले की, प्रेषित मुहम्मद (स.) उपाशी आहेत. आपल्याकडे असलेला भाकरीचा एक तुकडा ती प्रेषितांकडे घेऊन गेली. प्रेषित म्हणाले,

"फ़ातिमा (रज़ि.)! तीन दिवसांच्या सलग उपासमारीनंतर हा पहिला भाकरीचा तुकडा आहे, जो तुझ्या बापाच्या गळ्यात उतरत आहे."

हिजरी सन तीन मध्ये 'उहुद' चे युद्ध झाले.या युद्धात इस्लामी लष्कराचे अतोनात नुकसान झाले. स्वतः प्रेषित मुहम्मद (स.) यांचे दात तुटले. युद्धप्रसंगी काहींना गैरसमज झाला की प्रेषित मुहम्मद (स.) शहीद झाले. ही वार्ता मदीना शहरी पोचताच. समस्त शहरवासीयांवर दुःखाचे डोंगर कोसळले आणि घरातील स्त्रिया बाहेर येऊन आक्रोष करू लागल्या. फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा त्यात सामील होती. तिला राहावले नाही, ती थेट समर भूमीवर पोचली. तिथे तिला प्रेषित मुहम्मद (स.) जखमी अवस्थेत दिसले. त्यांच्या कपाळावरून भळभळा रक्त वाहत होते. माननीय अली (रज़ि.) प्रेषितांवर होणारा प्रत्येक वार स्वतःवर झेलित होते. फ़ातिमा (रज़ि.) प्रेषितांच्या जखमा धूत होती.

एकदा माननीय अली (रज़ि.) यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले,

"हे प्रेषित! तुमचे माझ्यावर जास्त प्रेम आहे की फ़ातिमावर?" यावर प्रेषितांनी (स.) उत्तर दिले,

"फ़ातिमा (रज़ि.) मला तुमच्याहून जास्त प्रिय आहे आणि फ़ातिमापेक्षा जास्त स्नेह तुमच्याशी आहे."

## प्रकरण बाविसावे

# नातलगांवर प्रेम करणारी फ़ातिमा (रज़ि.)

इस्लामने मानवजातीवर आणि विशेषत: आपल्या नातलगांवर स्नेह व उपकार करण्याची विशेष शिकवण दिली आहे. फ़ातिमा (रज़ि.) ही इस्लामवर गाढ श्रद्धा ठेवणारी आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या शिकवणींचे तंतोतंत पालन करणारी असल्याने हा गुणधर्म जणू तिच्या रक्तातच होता. ती इतर मानवांप्रमाणेच आपल्या सग्यासोयऱ्यांवर प्रेम करायची, अडचणीच्या प्रसंगी धावून जायची. कोणालाही किंचितही त्रास होऊन देण्याची खबरदारी बाळगायची. ती आपल्या सासूची मनापासून सेवा करायची. फ़ातिमाची सासू स्वत: म्हणते,

"फ़ातिमाने माझी जितकी सेवा केली तितकी इतर कोणत्याच सुनेने केली नाही."

माननीय अली (रज़ि.) यांचे वडील अर्थात फ़ातिमाचे सासरे माननीय जाफर बिन अबू तालिब (रज़ि.) मौताच्या युद्धात शहीद झाले. फ़ातिमा (रज़ि.) खूप दु:खीकष्टी होऊन ओक्साबोक्सी रडली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तिचे सांत्वन करताना म्हटले,

"होय खरेच ! जाफ़र (रज़ि.) सारख्या नेक माणसाच्या मृत्यूप्रसंगी रडणाऱ्यांस गप्प होणे कसे काय शक्य आहे !"

यानंतर प्रेषितांनी सांगितले की, "बेटी, धीर धर जाफरच्या मुलांसाठी जेवणांची व्यवस्था कर, कारण जाफर (रज़ि.) यांची पत्नी आज खूप दु:खी आहे. मुलांकडे पाहणे तिला शक्य होणार नाही."

फ़ातिमा (रज़ि.) आपल्या सावत्र आईंचीसुद्धा अत्यंत लाडकी होती आणि फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा आपल्या सावत्र मातांवर खूप प्रेम करीत असे. कारण फ़ातिमाची सख्खी आई आदरणीय खदीजा (रज़ि.) निधन पावली होती. अशा प्रसंगी चिमुकल्या फ़ातिमाचे संगोपान तिच्या सावत्र मातांनीच केले. तिला सख्ख्या आणि सावत्र आईचा जणू फरकच समजत नव्हता. अगदी सख्ख्या आईप्रमाणेच ती सर्व मातांवर प्रेम करीत असे.

खदीजा (रज़ि.) निधन पावल्यावर माननीय सौदा (रज़ि.) आणि आयशा (रज़ि.) प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या विवाहबंधनात आल्या. या दोघींनी चिमुकल्या फ़ातिमाची अगदी मनापासून काळजी घेतली. आयशा (रज़ि.) यांच्याशी तर फ़ातिमाची खूपच चांगली गट्टी जमलेली होती. फ़ातिमाच्या विवाहानंतर माय-लेकींच्या दोन खोल्यांदरम्यान एक मोठी खिडकी दोघी मायलेकींच्या संगनमताने तयार करण्यात आली होती. या खिडकीतून दोन्ही मायलेकी गप्पा टप्पा करीत. आई आयशा (रज़ि.)आपल्या लाडक्या फ़ातिमाचे नेहमी तोंडभरून कौतुक करीत असे. फ़ातिमा (रज़ि.) सुद्धा तिच्यावर विशेष प्रेम करीत असे. फ़ातिमाविषयी हदीसग्रंथात आणि इस्लामी इतिहासात असलेले महिमत्व स्वत: आई आयशा (रज़ि.) यांनीच कथन केलेले आहे.

## प्रकरण तेविसावे

# प्रेषित मुहम्मद (स.) यांनी फ़ातिमाचे उदाहरण दिले

मक्का शहरावर विजय प्राप्त झाल्यावर समस्त 'हिज्जाज' प्रदेशावर इस्लामी विधान लागू झाले. याचप्रसंगी एकदा त्या ठिकाणी 'फ़ातिमा' याच नावाची एक स्त्री चोरीच्या अपराधास्तव हजर करण्यात आली. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लामी विधानानुसार तिच्यावरील चोरीचा अपराध सिद्ध झाल्यास्तव तिचा हात कापण्याची शिक्षा सुनावली. ही स्त्री तेथील 'मख़ज़ूम' नावाच्या अत्यंत प्रतिष्ठित परिवारातील होती. प्रेषितांनी शिक्षा सुनावल्याची खबर लागताच तिच्या परिवारजनांच्या तोंडचे पाणी पळाले. आता आपली बेअब्रू होणार, समाजातील प्रतिष्ठा लयास जाणार, या भयाने त्यांचा थरकाप उडाला. यावर त्यांनी एक तोडगा काढण्याचे ठरविले. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे जवळचे अनुयायी माननीय उसामा (रज़ि.) यांना 'या स्त्रीची शिक्षा माफ करावी, अन्यथा आमची समाजातील प्रतिष्ठा मातीत मिळेल,' अशी शिफारस करण्यासाठी प्रेषितांकडे पाठविले. उसामा (रज़ि.) यांनी प्रेषितांना अपराधी स्त्रीची शिक्षा रद्द करण्याची शिफारस केली. मात्र प्रेषित मुहम्मद (स.) यांनी यावर तीव्र नाराजी व्यक्त करत उसामांना (रज़ि.) खडसावले, म्हणाले,

"ईश्वराने नेमून दिलेल्या विधानात बदल करण्याची तुम्ही शिफारस कशी काय करता?"

प्रेषितांचा हा अवतार पाहूनच उसामा (रज़ि.) यांचा थरकाप उडाला, म्हणाले,

"प्रेषिता! चूक झाली, माझे माता-पिता आपल्यावर कुरबान्! तुम्ही माझ्या मोक्षाकरिता ईशदरबारी प्रार्थना करावी!"

संध्याकाळ झाली. प्रेषित मुहम्मद (स.) भाषण देण्यासाठी उभे राहिले. ईशस्तवनानंतर म्हणाले,

"मागच्या काळातील लोक याच कारणास्तव बरबाद झाले की जेव्हा त्यांच्यातील वजनदार आणि प्रतिष्ठित व्यक्ती चोरी करीत तेव्हा तिला सोडून देण्यात येत असे आणि एखाद्या गरिबाने चोरी केली की त्यास कडक शिक्षा देत असे. अर्थात हा घोर अन्याय आहे. शपथ आहे त्या ईश्वराची, ज्याच्या ताब्यात मुहम्मदचे प्राण आहे, जर माझी लाडकी कन्या फ़ातिमाने जरी चोरी केली असती तर मी तिचाही हात कापला असता !"

प्रेषितांचे भाषण आटोपल्यावर त्या चोर स्त्रीचा हात कापण्यात आला. यानंतर या स्त्रीच्या जीवनात कमालीचा बदल झाला. ती सच्च्या अंत:करणाने इस्लामच्या नियमांची जोपासना करू लागली.

या घटनेतून प्रेषित मुहम्मद (स.) यांनी हे सिद्ध केले की न्याय-निवाड्यासमोर कोणीच लहान-मोठा नसतो. अपराधी गरीब असो की श्रीमंत, आपला असो की परका, मित्र असो की शत्रू, प्रतिष्ठित असो की अप्रतिष्ठित, अपराधाची शिक्षा मिळायलाच हवी. या ठिकाणी प्रेषितांची लाडकी कन्या फ़ातिमा (रज़ि.) जरी असती तर तिलाही प्रेषितांनी आवश्य शिक्षा दिली असती.

## प्रकरण चोविसावे

# प्रेषित मुहम्मद (स.) यांचे निधन

हिजरी सन अकरामध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांना ईश्वराज्ञा झाली. प्रेषित आजारी पडले, आजार वाढतच गेला आणि फ़ातिमा (रज़ि.) आपल्या पित्याची शुश्रूषा करण्यासाठी माननीय आयशा (रज़ि.) यांच्या (अर्थात आईच्या) घरी आली. प्रेषितांनी तिला पाहताच आनंदी स्वरात 'मरहबा माझ्या लेकी' (अर्थात माझ्या लेकी ! तुझे स्वागत असो) म्हणून माया व्यक्त केली. मग अत्यंत प्रेमाने तिला जवळ बोलावले, आपल्या जवळच बसविले आणि तिच्या कानात हळूच काहीतरी कुजबुजले. हे ऐकूनच फ़ातिमास रडू कोसळले. मग परत एकदा तिच्या कानात हळूच काहीतरी कुजबुजले नि तिच्या चेहऱ्यावर हसू उमटले. फ़ातिमाची लाडकी आई आयशा (रज़ि.) यांनी तिला या रहस्याबाबत विचारले, मात्र तिने नकार दिला. परंतु प्रेषितांच्या निधनानंतर आयशा (रज़ि.) यांच्या लाडिक विनंतीवरून फ़ातिमाने सांगितले की अगोदर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी तिच्या कानात सांगितले होते की ते लवकरच ईश-भेटीकरिता जात आहेत, हे ऐकून रडू कोसळले, मात्र दुसऱ्यांदा प्रेषितांनी खबर दिली होती की मी स्वर्गात स्त्रियांची सरदार असेन, याचे मला हसू आले.

निधनापूर्वी प्रेषितांवर वारंवार बेशुद्धावस्था येत होती. त्यांची अवस्था पाहून फ़ातिमाच्या काळजाचे तुकडे होत, डोळ्यांतून अश्रुंच्या धारा वाहत होत्या आणि म्हणत होती,

"तुमची ही अत्यावस्था मला पाहवत नाही !"

यावर प्रेषित तिचे सांत्वन करताना म्हणत होते,

"यानंतर तुझा बाप कधीच अत्यावस्थ होणार नाही ! लाडके ! तू रडू नकोस. तुझ्या रडण्यामुळे ईश्वराच्या ममत्व सागरातही उधान येत आहे !"

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी शेवटी जगाचा निरोप घेतला आणि समस्त इस्लामी जगत दुःखसागरात बुडाला. फ़ातिमावर तर दुःखाचे डोंगरच कोसळले. तिचे दुःख अनावर झाले नि तिने हात उंचावून ईशदरबारी प्रार्थना केली,

"हे ईश्वरा! मलाही लवकरच प्रेषितांकडे घेऊन जा. आता मला विरह सहन होत नाही. ईश्वरा ! अंतिम निवाड्याच्या दिवशी मला प्रेषितांची शिफारस लाभू दे!"

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कफन-दफन विधीनंतर प्रेषित सोबती फ़ातिमाच्या भेटीकरिता येत, तिचे सांत्वन करीत, मात्र तिचे दुःख कमी होत नव्हते. एवढेच नव्हे तर प्रेषितांच्या निधनानंतर कोणीही फ़ातिमांच्या चेहऱ्यावर हसू आलेले पाहिले नाही. ती नेहमी पित्याच्या मृत्यूच्या घटनेने दुःखीकष्टीच दिसली.

## प्रकरण पंचविसावे

# फ़ातिमाने जगाचा निरोप घेतला

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनामुळे अवघ्या इस्लामी जगतास जबर धक्का तर बसलाच, मात्र या घटनेचे सर्वांत जास्त दु:ख फ़ातिमास झाले होते, जणू तिचे सर्वकाही वाहून गेले. प्रेषितांच्या निधनानंतर ती कधीच हसली नाही, कोणत्याच गोष्टीचा तिला आनंद झाला नाही, ती मरेपर्यंत प्रेषितांच्या विरहाच्या दु:ख सागरात बुडाली होती.

प्रेषितांचे निधन होऊन थोडाच काळ उलटला होता आणि तिने ईश्वरदरबारी केलेली प्रार्थना स्वीकार झाली. तिला ईश्वराचे निमंत्रण आले. याच क्षणाची ती आतुरतेने केव्हाची वाट पाहत होती. शिवाय प्रेषितांनीही मागे म्हटले होतेच की,

''माझ्या निधनानंतर माझ्या संततीपैकी सर्वप्रथम मला तूच (अर्थात फ़ातिमा (रज़ि.)) येऊन भेटशील!''

शेवटी जमादिल आखिरच्या तीन तारखेस मंगळवारी, हिजरी सन अकरामध्ये म्हणजेच प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनाच्या अवघ्या सहा महिन्यांनंतर तिनेही या जगाचा निरोप घेतला. प्रेषितांची ही लाडकी कन्या सहा महिन्यांपेक्षा जास्त प्रेषितांचा विरह सहन करू शकली नाही. निधनानंतर तिने केलेल्या सूचनेनुसार माननीय अली (रज़ि.) यांनी तिला 'गुस्ल' दिला (स्नान करविले), तिच्या जनाजावर (डोलाऱ्यावर) खजुरींची पाने व्यवस्थित टाकून त्यावर व्यवस्थित कपडा टाकण्यात आला, जेणेकरून कोणास फ़ातिमाचे शव दिसता कामा नये. मग रात्रीच्या वेळी तिचा दफनविधी स्वत: माननीय अली (रज़ि.) यांनी केला. तिच्या जनाज्याची नमाज तात्कालीन खलीफा (इस्लामी शासक) माननीय अबू बकर (रज़ि.) यांनी पढविली.

फ़ातिमाचा दफनविधी अटोपून माननीय अली (रज़ि.) जेव्हा घरी परतले, तेव्हा ते अत्यंत दु:खी होते. आधीच प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनाने दु:खीकष्टी झालेले अली (रज़ि.) फ़ातिमासारख्या अत्यंत प्रेमळ आणि आज्ञाधारक पत्नीच्या निधनाने पार खचून गेले. फ़ातिमाच्या विरहात ते सारखे रडत आणि तिच्या कबरीवर जाऊन विव्हळत,

''हे ईश्वरा ! ही माझी काय अवस्था आहे की मी सलाम करतो आणि कबरीतून त्याचे उत्तर येत नाही. हे कबरी ! तुला काय झाले की माझ्या हाकेचे उत्तर देत नाही, तूही माझ्यावर रूसली आहेस काय?''

फ़ातिमाच्या निधनाची वार्ता मदीना शहरात पसरताच सर्वजन अक्रोश करीत घराबाहेर पडले. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनासारखेच दु:ख फ़ातिमाच्या निधनाचे लोकांना झाले.

माननीय अबू बकर अलींकडे येत, त्यांचे सांत्वन करीत, त्यांना धीर देत.

## प्रकरण सव्विसावे

# फ़ातिमाची थोरवी

इब्ने अबी हातिम (रज़ि.) यांचे कथन आहे, एकदा माननीय आयशा (रज़ि.) यांना माननीय अलीसंबंधी विचारण्यात आले, यावर त्या म्हणाल्या,

"तुम्ही अशा माणसाविषयी विचारता, जे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या विश्वासातले आणि ज्यावर प्रेषितांची विशेष मर्जी होती. प्रेषित ज्यांच्यावर जीवापाड प्रेम करीत होते."

यानंतर माननीय आयशा (रज़ि.) यांनी एक घटना सांगितली,

"एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी माननीय अली (रज़ि.), फ़ातिमा (रज़ि.) आणि हसन (रज़ि.) व हुसैन (रज़ि.) यांना जवळ बोलावून एका चादरीत घेतले आणि ईश्वराशी प्रार्थना केली,

'हे स्वामी ईश्वरा! हे माझे परिवारजन आहेत, यांना तुझी जवळीकता लाभू दे!"

मी प्रेषितांना म्हणाले, 'हे प्रेषिता मी सुद्धा आपली पत्नीच असून आपलीच परिवारजन आहे. मलाही या चादरीत घ्या ना!' यावर प्रेषित गंभीरपणे म्हणाले, आयशा (रज़ि.)! तू तर पुण्य आणि सत्याचीच मूर्ती आहेस. तू यात येऊ नकोस."

अशा प्रकारच्या बऱ्याच घटना इस्लामी इतिहासात सापडतात. बऱ्याच घटनांतून फ़ातिमाची विशेष थोरवी स्पष्ट होते. हीच बाब कुरआनातसुद्धा स्पष्ट करण्यात आलेली आहे.

एकदा माननीय अली (रज़ि.) यांना इस्लामचा कट्टर वैरी अबू जलच्या मुलीशी लग्न करण्याचा प्रस्ताव आला आणि त्या प्रसंगी फ़ातिमाकरिता प्रेषित मुहम्मद (स.) यांनी दिलेले भाषण आपण मागे पाहिलेले आहेच. याशिवाय आदरणीय प्रेषितांनी म्हटले आहे,

"स्वर्गातील स्त्रियांची सरदार मरयम (प्रेषित येशूची आई मेरी), मग फ़ातिमा (रज़ि.), मग खदीजा (प्रेषितांची पहिली पत्नी), मग आसिया (फिरऔनची पत्नी) होय."

आणखीन एके ठिकाणी म्हटले,

"तुमच्या अनुकरणासाठी जगातील समस्त स्त्रियांपैकी 'मरयम', 'खदीजा', 'फ़ातिमा (रज़ि.)' आणि 'आसिया' या स्त्रिया आदर्श होत."

(संदर्भ : तिर्मिजी हदीस संग्रह)

आणखीन एके ठिकाणी म्हटले आहे,

"स्वर्गात प्रवेश करणारी सर्वांत पहिली स्त्री ही फ़ातिमा (रज़ि.) असेल."

एकदा प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"हे फ़ातिमा (रज़ि.) ! तू ज्याशी नाराज होशील, ईश्वराचा त्यावर कोप असेल आणि तू ज्याशी नाराज नसशील, ईश्वराची त्यावर कृपा असेल."

अशी बरीच प्रेषितवचने फ़ातिमाची थोरवी स्पष्ट करतात. यावरून हे देखील समजते की प्रेषित मुहम्मद (स.) यांचे फ़ातिमावर किती प्रेम होते. ते फ़ातिमा (रज़ि.) आणि तिच्या मुलांवरदेखील खूप प्रेम करीत. ते म्हणत,

"हसन आणि हुसैन (रज़ि.) माझ्या मुलीची लाडकी मुले आहेत. हे स्वर्गातल्या तरुणांचे सरदार आहेत. यांना जो आनंद देईल, त्यावर ईश्वर प्रसन्न असेल आणि यांना दु:ख देणाऱ्यावर ईश्वराचा कोप असेल."

अर्थातच फ़ातिमा (रज़ि.) प्रेषितांची अत्यंत लाडकी लेक तर होतीच शिवाय तिच्या नसानसात इस्लामी विचारसरणी होती, ती प्रेषितप्रणालीवर काटेकोरपणे कृती करीत होती, ईश्वर आणि त्याच्या प्रेषितांवर आपल्या प्राणापेक्षाही जास्त प्रेम करणारी होती. म्हणूनच तिचे समस्त जीवन दीन-दलितांच्या सेवेसाठी अर्पण झालेले इतिहासात आढळून येते. तिने स्वत:करिता काहीही ठेवले नाही. आपले सर्वस्व ईश्वर आणि प्रेषितांवर ओवाळून टाकले.

## प्रकरण सत्ताविसावे

# फ़ातिमाची मुले

फ़ातिमास तीन मुलगे आणि दोन मुली होत्या. त्यांची नावे खालील प्रमाणे आहेत.

**मुलगे** : १) हसन (रज़ि.) २) हुसैन (रज़ि.) ३) मुहसिन (रज़ि.)

**मुली** : १) झैनब (रज़ि.) २) उम्मे कुलसूम (रज़ि.)

यापैकी आपण एकेकाचा थोडक्यात उहापोह करु या.

## १) माननीय हसन (रज़ि.) - प्रथम पुत्र

माननीय हसन (रज़ि.) हे अली (रज़ि.) आणि फ़ातिमा (रज़ि.) यांच्या दांपत्यिक जीवनातील उमललेले पहिले फूल होय. हे ज्येष्ठ सुपुत्र हिजरी सन तीन मध्ये रमज़ान महिन्याच्या पंधरा तारखेस जन्मले. प्रेषित मुहम्मद (स.) यांना त्यांच्या जन्मावर अत्याधिक आनंद झाला. हर्षोल्हासित होऊन त्यांनी आपल्या नातूचा चंद्रासारखा मुखडा पाहिला, त्याच्या एका कानात अज़ान देऊन ईशस्तवन केले. जन्माच्या सातव्या दिवशी 'अक़ीक़ा'चा विधी करून सामान्यांना भोजन दिले, दानधर्म केले.

माननीय हसन (रज़ि.) यांना वयाच्या आठव्या वर्षांपर्यंत प्रेषितांचा जीवनकाळ लाभला. प्रेषितांचे आपल्या नातूवर खूप प्रेम होते. याविषयी घटनांचा उल्लेख करण्यासाठी एका ग्रंथाची गरज आहे. मात्र या ठिकाणी थोडक्यात आटपते घेऊ या. 'बुखारी' च्या हदीस ग्रंथात उल्लेख आहे,

एकदा प्रेषित मुहम्मद (स.) भाषण देण्याच्या स्थानावर आरूढ होते. चिमुकले हसन (रज़ि.) त्यांच्या मांडीवर बसलेले होते. प्रेषितांनी हसनकडे पाहून समुदायास संबोधताना भविष्यवाणी केली,

"हा माझा नातू सरदार आहे. ईश्वर याच्या माध्यमाने मुस्लिमांच्या दोन गटांत तडजोड घडवून आणील."

प्रेषित मुहम्मद (स.) यांची भविष्यवाणी खरी ठरली आणि मुस्लिमांच्या दोन समुदायांत होणारा रक्तरंजीत संघर्ष माननीय हसन (रज़ि.) यांच्या त्यागी व निस्वार्थी भूमिकेमुळे टळला.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर सर्वांच्या सहमतीने माननीय अबू बकर (रज़ि.) यांची खलीफापदावर नियुक्ती करण्यात आली होती. तेसुद्धा प्रेषितांशी घनिष्ठ संबंध आणि लहानपणाचे मित्र शिवाय प्रेषितांवर आपले सर्वस्व त्यागणारे इस्लामी

आंदोलनातील प्रथम क्रमांकाचे अनुयायी असल्यामुळे आणि प्रेषितांच्या प्रेषितत्वावर सर्वप्रथम श्रद्धा ठेवणारे असल्यामुळे त्यांनाही माननीय हसनचा खूप लळा होता. माननीय हसन (रज़ि.) प्रेषितांचे अत्यंत लाडके असल्याने अबू बकर (रज़ि.) सुद्धा त्यांचा खूप लाड करायचे. एकदा माननीय अली (रज़ि.) आणि माननीय अबू बकर (रज़ि.) हे दोघे असरची नमाज पढून मस्जिदमधून सोबत बाहेर पडले. रस्त्यात चिमुकला हसन (रज़ि.) खेळत होता. अबू बकर (रज़ि.) हसनला पाहताच आनंदीत झाले. त्यास मोठ्या लाडीकपणे उचलून आपल्या खांद्यावर बसविले आणि अलींना म्हणाले,

"अली (रज़ि.)! हा मुलगा दिसायला हुबेहूब प्रेषितांसारखाच आहे, तुमच्यासारखा मुळीच नाही!"

अबू बकर (रज़ि.) यांचे शब्द ऐकून अलींना हसू आवरले नाही. खरोखरेच माननीय हसन (रज़ि.) यांचा चेहरा-मोहरा हुबेहूब आपल्या आजोबांसारखाच होता.

अबू बकर (रज़ि.) नंतर माननीय उमर (रज़ि.) खलीफा झाले, त्यांनीसुद्धा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या या दोन्ही लाडक्या नातवांचा खूप लाड केला, त्यांची विशेष काळजी वाहिली. माननीय उमर यांनी हसन व हुसैन (रज़ि.) आणि इतर भावंडाना काहीच कमी पडू दिले नाही. बैतुलमालमधून त्यांच्या शिक्षण-प्रशिक्षण आणि उदरनिर्वाहासाठी विशेष निधी उपलब्ध करून दिला. अर्थातच बदरच्या युद्धापूर्वी इस्लाम स्वीकारणाऱ्यांच्या निधीएवढा निधी (वार्षिक पाच हजार दिरहम) उपलब्ध करून दिला. यावरून हे लक्षात येते की माननीय उमर (रज़ि.) यांच्या अंत:करणात हसन व हुसैन (रज़ि.) विषयी किती जिव्हाळा होता.

माननीय उमर (रज़ि.) यांच्या पश्चात माननीय उस्मान (रज़ि.) हे खलीफ़ा झाले तेव्हा माननीय हसन (रज़ि.) तरूण झाले होते. त्यांनीही हसनची मागील खलीफाप्रमाणेच काळजी वाहिली. हिजरी सन तीसमध्ये माननीय उस्मान (रज़ि.) यांच्या आदेशाने तबरिस्तानवर हल्ला करण्यात आला. या लष्करात माननीय हसनसुद्धा सामील होते. या युद्धात त्यांनी आपले शौर्य पणाला लावले आणि आपल्या कौशल्याची चुणुक दाखविली. ते अत्यंत शूर व धाडसी तर होतेच शिवाय युद्धकौशल्यात तरबेजही होते. माननीय उस्मान (रज़ि.) यांच्यावर जेव्हा काही बंडखोरांनी प्राणघातक हापला केला तेव्हा त्यांच्या रक्षणार्थ माननीय हसन व हुसैन (रज़ि.) या दोन्ही भावंडांनी प्राण पणाला लावले, आपल्या शरीरावर घाव झेलले. मात्र बंडखोरांनी घराच्या मागील भिंतीस भगदाड पाडून खलीफ़ा उस्मान (रज़ि.) यांना शहीद केले.

माननीय उस्मान (रज़ि.) यांच्या पश्चात माननीय अली (रज़ि.) यांना इस्लामी शासनाची धुरा हाती घेण्याची विनंती केली व अशी भूमिका घेतली की,

''जोपर्यंत समस्त मुस्लिम देशातील लोकांची सहमती मिळत नाही, तोपर्यंत ही धुरा हाती घेऊ नका!''

मात्र माननीय अली (रज़ि.) यांनी आपल्या सुपुत्रास म्हटले की, इस्लामी शासनाची धुरा सांभाळण्यासाठी समस्तांच्या सहमतीची गरज नसून केवळ मुहाजिरीन व अन्सार यांच्याच सहमतीची गरज आहे. त्यांच्या सहमतीनंतर समस्त मुस्लिमांवर त्यांचा आदेश पाळणे आवश्यक आहे. म्हणून या नाजुक प्रसंगी माननीय अली (रज़ि.) यांना खलीफ़ा करण्यात आले.

माननीय अली (रज़ि.) आणि माविया (रज़ि.) यांच्या दरम्यान तड़जोड़ीतसुद्धा माननीय हसन (रज़ि.) यांनी महत्त्वाची भूमिका बजावली. काही खलीफ़ा असण्याची कर्तव्ये पार पाडतानाच 'इब्ने बलजम' नावाच्या एका माथेफिरूने खलीफ़ा माननीय अली (रज़ि.) यांच्यावर प्राणघातक हल्ला केला. हल्ला झाल्यावर माननीय अली (रज़ि.) तीन दिवस जीवंत होते. या काळात मुस्लिम समुदायाचे काही बुजुर्ग आणि मुरब्बी लोक जमले, त्यांनी माननीय अली (रज़ि.) यांना सल्ला दिला की, आपल्या पश्चात माननीय हसन (रज़ि.) यांना खलीफा करून जावे. यावर अली (रज़ि.) यांनी सांगितले की,

''मी याचा आदेशही देत नाही व मनाईसुद्धा करीत नाही. तुम्हास जे योग्य असेल ते करावे.''

असे सांगून तिसऱ्या दिवशी माननीय अलींनी या जगाचा निरोप घेतला. त्यांचा दफनविधी झाल्यावर कूफा शहराच्या जामा मस्जिदमध्ये सर्व सहमतीने माननीय हसन (रज़ि.) यांना खलीफ़ा नेमण्यात आले. मात्र सीरियाचे गव्हर्नर असलेल्या माननीय अमीर माविया (रज़ि.) यांनी माननीय हसन यांना ख़लीफ़ा म्हणून स्वीकारण्यास नकार दिला. एवढेच नव्हे तर त्यांनी खलीफाविरुद्ध बंडखोरीचे रणशिंग फुंकले. एक बलाढ्य लष्कर 'अब्दुल्लाह बिन आमिर (रज़ि.) यांना देऊन मदायन' कडे पाठविले. माननीय हसन (रज़ि.) हे यावेळी कूफामध्ये होते. बंडखोर लष्कर येत असल्याची खबर मिळताच त्यांनीही लष्कर तयार करून 'मदायन'कडे कूच केले. दोन्ही लष्कर आमने-सामने भिडण्यापूर्वीच अब्दुल्लाह बिन आमिरने त्यांना युद्ध न करता वाटाघाटीचे निमंत्रण दिले. उभयपक्षांत वाटाघाटी झाल्या नि त्यागीपुरुष माननीय हसन (रज़ि.) यांनी मानवसमाजाच्या कल्याणास्तव इस्लामी शासनाची धुरा झुगारून दिली. कारणही तसेच होते. दोन्ही लष्करात युद्धाची ठिणगी उडताच भयंकर रक्तपात होणार होता. विनाकारण कित्येक

निष्पापांचा बळी जाणार होता. कारण माननीय हसन (रज़ि.) यांचे लष्कर युद्धभावनेने प्रेरित होऊन आमिर मावियांच्या लष्कराकडे सरसावत होते. हे लष्कर पाहूनच आमिर मावियांचे विशेष सल्लागार अमरु बिनुल आस (रज़ि.) आमिर मावियांना म्हणाले,

"हे आपल्याकडे विद्युत गतीने येणारे लष्कर पाहून असे वाटते की जोपर्यंत हे आपणा सर्वांची कत्तल करणार नाही, तोपर्यंत परत फिरणार नाही. शिवाय आपलेही लष्कर त्यांना सहजासहजी सोडणार नाही."

यावर आमिर माविया (रज़ि.) म्हणाले,

"जर दोन्हीकडील लष्कराचे प्राण जातील तर त्यांच्या बायकांमुलांची जवाबदारी कोण घेईल? त्या विधवा आणि अनाथांविषयी जाब देण्यासाठी आपल्याला ईश्वरासमोर तोंड दाखविता येणार नाही."

त्यामुळे आमिर मावियांनी मानवीय हसन (रज़ि.) यांच्याकडे वाटाघाटीचा प्रस्ताव पाठविला. माननीय हसन (रज़ि.) यांनीही त्यांच्यां युद्ध टाळण्याचा प्रस्तावास मान दिला आणि शेवटी वाटाघाटीमध्ये खालील अटी व शर्ती ठरविण्यात आल्या.

१) समस्त जनतेस विनाशर्त अभय मिळावे, प्रत्येकास पूर्णत: संरक्षण मिळावे. कोणत्याही पक्षाने आपल्या विरोधी पक्षातील लोकांवर सूड उगवू नये.

२) 'हवाझ' या प्रांताचे पूर्ण मांडलिकत्व माननीय हसन (रज़ि.) यांच्या ताब्यात असेल आणि दोन लाख दिरहम वार्षिक प्रमाणे माननीय हसन (रज़ि.) यांना आमिर मावियांकडून निधी देण्यात येईल.

३) मिळकती व आयमध्ये 'उमय्या' परिवारापेक्षा हाशिम परिवारास प्रभुत्व देण्यात येईल. माननीय हसन (रज़ि.) यांनी या अटी लिहून अब्दुल्लाह बिन आमिर (रज़ि.) यांच्यामार्फत आमिर मावियांकडे पाठविले. आमिर माविया (रज़ि.) यांनी रीतसर या अटी मान्य करून सही शिक्का मारला. या पत्रकावर बड्या मंडळीतील काही लोकांच्या साक्षी म्हणून सह्या करून माननीय हसन (रज़ि.) यांच्याकडे पाठविले. अशाप्रकारे मानवांत होणारा मोठा रक्तपात माननीय हसन (रज़ि.) यांच्या परम त्यागी भूमिकेमुळे टळला. ही तडजोड आटोपून माननीय हसन (रज़ि.) यांनी कूफाकडे कूच केली. तेथे जामा मस्जिदमध्ये त्यांनी सत्तात्यागाविषयी प्रचंड जनसमुदायास उद्देशून भाषण देताना म्हटले,

"हे लोकहो! ईश्वराने आमच्या पूर्वजांच्या माध्यमाने मावनजातीस सत्यमार्ग दाखविला आणि आजच्या पिढीच्या माध्यमाने तुमच्यात होणारा रक्तपात टाळला. ईशपरायणता व त्याग सर्वांत मोठी विवेकता असून पातककर्म हे बुद्धी भ्रष्ट होण्याचे सर्वांत

मोठे लक्षण आहे. खिलाफ़त (अर्थात इस्लामी शासनाची धुरा) वर माझा जरी अधिकार असला तरी ही एक मोठी जवाबदारी असून रयतेस सत्यमार्गावर ठेवणे हे खलीफाचे क़र्तव्य असते. मात्र मानवां-मानवांदरम्यान रक्तपात होऊ नये म्हणून मी हा अधिकार त्यागून इस्लामी सत्तेची धुरा आमिर माविया (रज़ि.) यांच्या स्वाधीन करीत आहेत."

जनतेस संबोधित केल्यावर आपल्या परिवारजनांना घेऊन ते मदीनेकडे रवाना झाले. अशा प्रकारे प्रेषित मुहम्मद (स.) यांची भविष्यवाणी खरी ठरली की,

"माझा हा नातू सरदार आहे. ईश्वर याच्या माध्यमाने मुस्लिमांच्या दोन मोठ्या गटांदरम्यान तडजोड घडवून आणील."

मदीना परतल्यावर त्यांनी कधीच राजकीय धामधुमीत जीवनभर भाग घेतला नाही. आपला जास्तीतजास्त वेळ त्यांनी ईशभक्ती आणि समाजाच्या सेवेत व्यतीत केला. एकदा आमिर माविया (रज़ि.) यांनी एका व्यक्तीस माननीय हसन (रज़ि.) यांची खबर विचारली असता ती व्यक्ती म्हणाली,

"ते फ़जर (सकाळ) ची नमाज पढल्यावर नमाजस्थळी ते सूर्योदयापर्यंत ईशस्तवन करीत असतात आणि मग भिंतीस टेक लावून लोकांच्या गाठीभेटी घेऊन त्यांच्या समस्या सोडवितात. यानंतर चाश्तची नमाज अदा करून प्रेषितभार्यांच्या भेटीसाठी जातात."

माननीय हसन (रज़ि.) यांच्याकडे संपत्तीची कमतरता नव्हती. 'अहवाज' येथूनच त्यांना दहा लाख दिरहमची वार्षिक मिळकत होती. मात्र ते नेहमीच सामान्यांसारखे जीवन जगत होते. आपल्याकडे येणारा पैसा आणि संपत्ती ते सढळ हाताने लोकांना दान करीत, लोकांचे प्रश्न सोडविण्यासाठी खर्च करीत, दीन-दलित आणि पामरांच्या सेवेत संपत्ती मनसोक्तपणे खर्च करीत. कारण गरजवंत आणि वंचितांची सेवा करणे ही खरी ईश्वराची आराधना असल्याचे बाळकडू लहानपणीच त्यांचे अजोबा (प्रेषित मुहम्मद (स.)) यांनी त्यांना पाजले होते. दोन वेळा त्यांनी आपल्या मालकीची पूर्ण संपत्ती जनसेवेसाठी अर्पण केली. तसेच तीनदा त्यांनी आपल्या संपत्तीचा निम्मा भाग लोकांना दान केला. त्यांच्या दारी आलेला कोणताही याचक रिकाम्या हाती परत जात नसे. एकदा ते रमज़ान महिन्यात 'एअतिकाफ़' साठी (अर्थात ईश्वर भक्तीसाठी) बसलेले असताना एका याचकाने साद घातली. ते तात्काळ एअतिकाफ़मधून बाहेर आले आणि त्याची अडचण दूर केली आणि मग 'एअतिकाफ़' मध्ये येऊन बसले. होणारही असेच. इस्लामने हीच शिकवण दिली की 'अगोदर समाजसेवा आणि मग ईशभक्ती.' कारण इस्लाम हा मुळात समाजाच्या कल्याणासाठीच आलेला आहे. ईशभक्तीतून माणूस समाजकल्याणाचीच प्रेरणा घेत

असतो आणि समाजाच्या कल्याणासाठी झटत असतो. इस्लामने स्पष्टपणे म्हटले आहे की ज्या धर्मात समाजाचे कल्याणच अथवा ईश्वर उपासना नसेल, तो धर्म आणि उपासना काय उपयोगाची? ज्या धर्मात माणसाला आणि माणसाच्या प्रश्नांना, मानवता व मानवतेच्या विकासालाच महत्त्व नसेल, जो धर्म मानवां-मानवांमध्ये फूट पाडून मानवांचे रक्त सांडत असेल, जो धर्म मानवांना कनिष्ठ समजून आणि नीच व अस्पृश्य समजून त्यांना पायदळी तुडवित असेल, मानवांचे जगणे कठीण करून सोडीत असेल, तो कसला धर्म?

माननीय हसन (रज़ि.) यांनी आपले समस्त जीवन इस्लामी विधानावर तंतोतंत व्यतीत केले. माननीय हसन (रज़ि.) यांचे निधन हिजरी सन पन्नास मध्ये झाले. त्यांच्या निधनाची वार्ता पसरताच समस्त इस्लामी जगतात शोककूल वातावरण पसरले. त्यांच्या निधनप्रसंगी माननीय अबू हुरैरा (रज़ि.) म्हणू लागले,

"लोकांनो ! आज रडून घ्या. कारण प्रेषित मुहम्मद (स.) यांचा लाडका आज आपल्यास सोडून जात आहे !"

माननीय हसन (रज़ि.) यांच्या पश्चात आठ मुलगे अनुक्रमे अलहसन, झैद, उमर, कासिम, अबू बकर, अब्दुर्रहमान, तलहा आणि उबैदुल्लाह होत.

माननीय हसन (रज़ि.) यांनी ज्या परिवारात जन्म घेतला तो परिवार म्हणजे स्वयं प्रेषित मुहम्मद (स.) यांचा परिवार होय. अर्थातच ज्ञान, शिक्षण, ईशपरायणता आणि समाजसेवेत अहोरात्र व्यस्त असलेला आणि सत्यस्थापनेत आपले जीवन समर्पित करणारा परिवार. या परिवाराचे संस्कार त्यांच्यावर साहजिक पडणार. यामुळे त्यांच्यात सत्याचे ज्ञान आणि मानव कल्याणाची प्रखर जाणीव तर होतीच, शिवाय त्यागाची भावना असल्यामुळेच त्यांच्या हातून माणसामाणसामध्ये होणारा रक्तरंजित संघर्ष टळला. त्यांचा चेहरा-मोहरा आणि शारीरिक जडण-घडण आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासारखी तर होतीच, शिवाय जीवनशैलीसुद्धा प्रेषितांसारखीच होती. मृदू आणि मनमिळाऊ स्वभाव, त्याग व बलिदान, संयम आणि धाडस, प्रेम व बंधुभाव यासारख्या अलंकारांनी त्यांचे जीवन अलंकृत होते. शिवाय प्रचंड बुद्धिमत्ता लाभलेले माननीय हसन (रज़ि.) हे एक थोर विचारवंतसुद्धा होते. ते नेहमी म्हणत,

"सत्यवचन, उच्चनैतिकता, बंधुभाव, शिष्टाचार, पाहुणचार इतरांचे आपल्यावर असलेल्या अधिकारांची जाणीव या बाबी मानव या नात्याने माणसात असणे आवश्यक आहे. शिवाय याबरोबरच युद्धाच्या प्रसंगी शत्रूवर जोरदार हल्ला करणेसुद्धा आवश्यक आहे. याचकाची मागणी पूर्ण करणे, उपकाराची परतफेड करणे, शेजाऱ्यांच्या अधिकारांची जोपासना व त्यांचे रक्षण करणे, निर्लज्जपणाचे वर्तन

न करणे हे माणसाच्या जीवनात असणे गरजेचे आहे. इतरांनाही आपल्या जीवनात सामील करून घेणाऱ्याचे जीवन उत्तम व सार्थक तर इतरांना आपल्यातून डावलणाऱ्याचे जीवन निकृष्ट व निरर्थक आहे.''

एकदा एक व्यक्ती माननीय हसन (रज़ि.) यांना म्हणाली,

''मला मरणाचे खूप भय वाटते.''

यावर हसन (रज़ि.) उत्तरले,

''याचे कारण असे की तुम्ही खूप संपत्ती गोळा करून ठेवली आहे, जर ती ईशमार्गात दान कराल तर तुम्हास मृत्यूचे भय वाटण्याऐवजी आकर्षण वाटेल.''

ते म्हणत असत,

''माणसाने आपल्या धर्म नीट पाळावा, आपल्या संपत्तीची निगराणी करावी, योग्य वेळेवर, योग्य ठिकाणी खर्च करावी, सलाम करून लोकांचे हित चिंतावे, शांती व सुरक्षेची सर्वांसाठी प्रार्थना करावी, लोकांशी स्नेह व प्रेमाने वागावे. तसेच इतरांना त्यांनी मागणी करण्यापूर्वी दान द्यावे, त्यांच्या गरजा पूर्ण कराव्यात, परोपकार करावा, योग्यप्रसंगी योग्य व्यक्तीस अन्नदान करावे, भुकेल्यांना जेवू घालावे, तहानलेल्यांना पाणी पाजावे, शरीर झाकण्यासाठी वस्त्रे द्यावी, यालाच परोपकार म्हणतात. शेजाऱ्यांचे रक्षण करावे, अडलेल्या आणि अडी-अडचणींच्या ठिकाणी त्यांची सर्वोपरी मदत करावी, आपल्यावर होणाऱ्या गैरवर्तनावर संयम बाळगावा, हेच शौर्य आणि धाडसाचे काम आहे.''

एकदा आमिर माविया (रज़ि.) यांनी माननीय हसन (रज़ि.) यांना विचारले,

''शासनकर्ता या नात्याने आमचे कर्तव्य काय आहे?'' यावर माननीय हसन (रज़ि.) उत्तरले, ''आपलेही तेच कर्तव्य आहे जे प्रेषित सुलैमान (अ.) आणि त्यांचे पिता प्रेषित दाऊद (अ.) यांनी सांगितले.''

त्यांनी काय सांगितले? आमिर माविया (रज़ि.) यांनी प्रश्न केला, यावर माननीय हसन (रज़ि.) उत्तरले,

''शासनकर्त्याने नेहमीच आपल्या आंतरिक आणि बाह्य जीवनात ईशपरायणता बाळगावी. राग आणि आनंद या दोन्ही अवस्थांमध्ये सत्य आणि न्यायाची कास सोडता कामा नये. गरिबी आणि श्रीमंतीत मध्यममार्गी असावे, कोणाचीही संपत्ती बळजबरीने बळकावू नये आणि आपल्या संपत्तीची उधळपट्टीही करू नये. जोपर्यंत शासकात हे गुण असतील, तोपर्यंत त्याच्या शासनास धक्काही लागणार नाही.''

## २) माननीय हुसैन (रज़ि.) - द्वितीय पुत्र

## (शहीदे 'कर्बला')

माननीय हुसैन (रज़ि.) हे 'कर्बला' या ठिकाणी सत्यासाठी शहीद झाले आणि त्यांचे हौतात्म्य इतिहासात अजरामर झाले. म्हणूनच त्यांना 'कर्बला' चे शहीद म्हणूनही ओळखले जाते. माननीय हुसैन (रज़ि.) हे माननीय अली (रज़ि.) आणि फ़ातिमा (रज़ि.) यांचे द्वितीय धाडसी पुत्र होत. प्रेषित मुहम्मद (स.) यांचे अत्यंत लाडके नातू हिजरी सन चारच्या शाबान महिन्यातील पाच तारखेस जन्मले. आपले मोठे बंधु माननीय हसन (रज़ि.) प्रमाणेच आपल्या आजोबांचे अत्यंत लाडके होत. जन्म झाला तेव्हा प्रेषितांना खबर होताच ते तात्काळ फ़ातिमा (रज़ि.) कडे पोचले. नवजात शिशुच्या कानात अजान म्हटली. रीतिनुसार अक़ीक़ाचा विधी केला आणि हुसैन असे नाव ठेवले. माननीय हसन (रज़ि.) प्रमाणेच यांचाही चेहरा-मोहरा अगदी प्रेषितांसारखाच होता. चालणे, बोलणे, हसणे वगैरे सर्वकाही प्रेषितांचेच जणू प्रतिबिंब. प्रेषित मुहम्मद (स.) हे माननीय हसन (रज़ि.) प्रमाणेच माननीय हुसैन (रज़ि.) वर जीवापाड प्रेम करीत, खूप लाड करीत.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर खलीफ़ा माननीय अबू बकर (रज़ि.), त्यांच्यानंतर खलीफ़ा माननीय उमर (रज़ि.) आणि त्यांच्यानंतर खलीफ़ा माननीय उस्मान (रज़ि.) यांनी माननीय हसन (रज़ि.) प्रमाणेच माननीय हुसैनवर भरभरून प्रेमसुमने उधळली, त्यांचे विशेष लक्ष ठेवले, खूप लाड केले, शिक्षण-प्रशिक्षणाची विशेष काळजी घेतली. कारण माननीय हसन व हुसैन (रज़ि.) हे दोघे प्रेषितांचे लाडके असल्याने खलीफ़ा त्यांचा लाड करणारच.

खलीफ़ा उमर (रज़ि.) यांच्या काळात येमेनहून काही पोषाख आले, खलीफ़ा उमर (रज़ि.) यांनी पाहिले की माननीय हसन व हुसैन (रज़ि.) यांना पोषाख कमी पडलेत, तेव्हा त्यांनी तात्काळ येमेनच्या राज्यपालास आणखीन दोन पोषाख पाठविण्याचा आदेश दिला. माननीय हसन व हुसैन (रज़ि.) यांना पोषाख मिळाल्यावरच खलीफ़ा उमर (रज़ि.) यांनी इतर पोषाख प्रेषितसोबत्यांमध्ये वाटप केले. माननीय हुसैन (रज़ि.) खलीफ़ा उमर (रज़ि.) बालपणी खेळ खेळत आणि उमर (रज़ि.) सुद्धा चिमुकल्या हुसैनबरोबर लहानमुलासारखे खेळत, लहान मुलासारखे बोलत असत. खलीफ़ा उमर (रज़ि.) त्यांच्यावर जीवापाड प्रेम करीत.

खलीफ़ा उमर (रज़ि.) नंतर माननीय उस्मान (रज़ि.) हे खलीफ़ा झाले, तेव्हा हुसैन (रज़ि.) सव्वीस वर्षांचे तरूण होते. तबरिस्तानवर इस्लामी लष्कराने हल्ला केला तेव्हा माननीय हुसैन (रज़ि.) हेसुद्धा इस्लामी लष्करात सामील झाले आणि आपल्या शौर्य व युद्धकौशल्याचे प्रदर्शन घडवून मोठमोठ्या शूरवीरांना आश्चर्याचा जबर धक्का दिला.

यानंतर त्यांचे पिता माननीय अली (रज़ि.) खलीफ़ा झाले, तेव्हा जमल व सिफ़्फ़ैनच्या युद्धात त्यांनी शौर्याचा इतिहास घडविला. हिजरी सन चाळीसमध्ये खलीफ़ा अली (रज़ि.) शहीद झाल्यावर माननीय हसन (रज़ि.) खलीफ़ा झाले. माननीय हसन (रज़ि.) यांनी शासनाचा त्याग केला तेव्हा माननीय हुसैन (रज़ि.) यांनी त्यांना शासन त्याग न करण्याचा सल्ला दिला. मात्र माननीय हसन (रज़ि.) यांनी लोकांत होणारा रक्तपात टाळण्यासाठी त्यांचा सल्ला ऐकला नाही. शेवटी खिलाफ़त अर्थात इस्लामी शासन आमिर माविया (रज़ि.) यांच्या हाती आल्यावर रोमन सम्राटाची राजधानी कॉन्स्टॅंटिनोपालवर इस्लामी लष्कराने चढाई केली, तेव्हा माननीय हुसैन (रज़ि.) यांनी लष्करात भाग घेतला. याच काळात माननीय हसन (रज़ि.) यांच्या निधनाचे दु:ख त्यांना झेलावे लागले.

आमिर माविया (रज़ि.) यांनी आपल्या निधनापूर्वी आपला पुत्र 'यज़ीद' यास खलीफ़ा करण्याचे ठरविले. याप्रसंगी त्यांनी मदीनावासीयांकडून 'यज़ीद' याला खलीफ़ा करण्यासाठी मत मागितले. मात्र माननीय हुसैन (रज़ि.) आणि काही इतर बुजुर्ग लोकांनी यजीदच्या हाती इस्लामी शासनाची धुरा सोपविण्यास प्रखर विरोध केला. या प्रसंगी आमिर माविया यांनी हिजरी सन साठ मध्ये आपल्या मृत्यूपूर्वी आपला मुलगा यज़ीद यास बोलावून म्हटले,

"माझ्या मृत्यूनंतर इराकवासी माननीय हुसैन (रज़ि.) यांना तुझ्या विरोधात उभा करतील आणि हुसैन जर तुझ्या विरोधात उभे राहिले, तेव्हा तू त्यांच्या विरोधात शक्तीचा वापर करू नये. कारण ते प्रेषित मुहम्मद (स.) यांचे लाडके नातू आहेत."

(संदर्भ : तिबरी वल फ़खरी)

आमिर माविया (रज़ि.) यांच्या मृत्यूपश्चात त्यांचा मुलगा 'यज़ीद' याने शासनाची सूत्रे हाती घेतली तेव्हा त्यास या गोष्टीची जाणीव झाली की माननीय हुसैन (रज़ि.) आणि माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रज़ि.) यांच्यासारखे प्रतिष्ठित आणि समाजात प्रचंड वजन असलेल्या ईशपरायण व्यक्ती आपले शासन स्वीकारणार नाहीत. परिणामी आपले शासन स्थिर राहू शकणार नाही. माननीय हुसैन (रज़ि.) आणि अब्दुल्लाह बिन जुबैर (रज़ि.) हे या वेळी मदीना शहरात वास्तव्यास होते. यज़ीदने मदीनाचा राज्यपाल वलीद बिन उतबा यास आदेश दिला की, हुसैन (रज़ि.) आणि अब्दुल्लाह (रज़ि.) यांना माझे शासन स्वीकारण्यास भाग पाडावे. माझ्या हितात मत घ्यावे. केंद्र शासनाचे आदेश मिळताच वलीदने या दोघांना यज़ीदचे शासन स्वीकार करण्याची विनंती केली. या दोन्ही बड्या नेत्यांनी यावर विचार करण्याची संधी मागितली. वलीदने मुदत देताच माननीय हुसैन (रज़ि.) आणि अब्दुल्लाह (रज़ि.) या दोघांनी आपल्या परिवारजनांसह गुप्तपणे मक्का शहर गाठले. त्यांच्या विरोधात कार्यवाही करण्यासाठी वलीदच नव्हे तर केंद्र शासक यजीदसुद्धा धजावला नाही.

माननीय हुसैन (रज़ि.) हेच खरे पाहता इस्लामी शासन सांभाळण्यासाठी समस्त इस्लामी जगतात एक पात्र व्यक्ती होते. लोकांमध्ये त्यांच्याविषयी अपार सहानुभूती होती. कारण ते न्यायी, सत्यनिष्ठ आणि सर्वांत जास्त ईशपरायण होते. सत्यस्थापना आणि मानवी स्वातंत्र्यासाठी आपल्या अंत:करणात तीव्र भावना असलेले, सर्वसामान्यांचे कैवारी आणि दीन-दलितांविषयी कमालीची सहानुभूती असलेले प्रेषित मुहम्मद (स.) यांचे हे लाडके नातू असल्याने सर्वांच्याच काळजाचे तुकडे होते. त्यांचा विरोध पत्करणे हे यज़ीदला कधीच परवडणारे नव्हते. म्हणून सुरुवातीस त्याने सबुरीने घेतले, त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. मात्र त्याचे प्रयत्न फोल ठरले. मानवी स्वातंत्र्य हिरावून घेणारे आणि मानवाधिकार पायदळी तुडविणारे यज़ीदचे शासन माननीय हुसैन (रज़ि.) आणि माननीय अब्दुल्लाह बिन जुबैर (रज़ि.) यांच्यासारखे ईशपरायण लोक मुळीच स्वीकारण्यासारखे नव्हते.

दुसरीकडे इराकवासीयांकडून माननीय हुसैन (रज़ि.) यांना सतत विनंतीपत्रे येऊ लागली. कारण इस्लामी जगतावर यज़ीदचे शासन हे बळजबरीने लादलेले शासन होते. चार खलीफ़ांच्या सुवर्णयुगात जगलेली रयत बळजबरीचे शासन आल्याने नाराज होती आणि म्हणूनच माननीय हुसैन (रज़ि.) यांनी इस्लामी शासनाची धुरा हाती घेण्याची विनंती असणारी पत्रे इराकवासीयांकडून माननीय हुसैन (रज़ि.) यांना प्राप्त होत होती. 'कूफ़ा' हे शहर त्या काळी इराकची आणि अली (रज़ि.) यांच्या शासनकाळात इस्लामी जगताची राजधानी होती. कूफावासींच्या विनंतीची शहानिशा करण्यासाठी माननीय हुसैन (रज़ि.) यांनी आपले चुलत बंधु माननीय मुस्लिम बिन अकील (रज़ि.) यांना 'कूफा' येथे पाठविले. कूफ़ा शहरी पोचताच हजारोंच्या संख्येत जनता माननीय मुस्लिम बिन अकील (रज़ि.) यांच्याकडे उलटली, यजीदच्या जुलमी शासनाच्या तावडीतून आपल्याला मुक्ती देण्याची विनंती करू लागली. सर्वांनी मुस्लिम (रज़ि.) यांच्या समक्ष माननीय हुसैन (रज़ि.) यांचे शासन स्वीकारण्याची प्रतिज्ञा घेतली. माननीय मुस्लिम (रज़ि.) यांनी या अनुकूल परिस्थितीचा सविस्तर वृत्तान्त माननीय हुसैन (रज़ि.) यांना लिहून पाठविला. मुस्लिम (रज़ि.) यांचे पत्र मिळताच माननीय हुसैन (रज़ि.) हे आपले परिवारजन आणि काही जीवलग सवंगडी घेऊन कूफ़ाकडे निघाले.

दुसरीकडे यजीदला माननीय हुसैन यांच्या समर्थनार्थ कूफा शहरातील जनतेच्या उघड बंडखोरीची खबर मिळाली आणि तो चवताळून उठला. म्हणुन त्याने आपल्या क्रूर चुलत भाऊ इब्ने झियाद यास ही बंडखोरी चिरडून टाकण्यासाठी कूफ़ा शहरी पाठविले. इब्ने झियाद हा अत्यंत क्रूर आणि प्रसंगी काहीही करण्यास मागेपुढे न पाहणारा तरूण होता. त्याने जलदगतीने कूफ़ा गाठले, माननीय मुस्लिम बिन अक़ील (रज़ि.) सारख्या

वृद्ध गृहस्थास अत्यंत क्रूरपणे ठार केले. रयतेस जीवे मारण्याची आणि स्त्रिया व मुलांना विधवा व अनाथ करण्याची धमकी देऊन तलवारीच्या जोरावर हे बंड चिरडून टाकले. माननीय हुसैन (रज़ि.) यांना प्रवासादरम्यानच इब्ने झियाद तर्फे आपल्या प्रतिनिधी मुस्लिम बिन अक़ील (रज़ि.) यांच्या हत्येची वार्ता मिळाली आणि ते खूप दु:खी झाले. त्यांनी आपल्या काफिल्यासह प्रवास सुरुच ठेवला. प्रचंड इच्छाशक्ती आणि रयतेस जुलमी शासनातून मुक्ती देण्याचा ध्यास असलेले माननीय हुसैन (रज़ि.) हे परत मागे फिरण्याचा प्रश्नच नव्हता. ते आपल्या काफिल्यासह 'नेनवा'च्या प्रदेशात पोचले असताच यज़ीदच्या सैन्याने माननीय हुसैन (रज़ि.) यांना गाठले. या सैन्याचा प्रमुख हा इब्ने झियादच होता. हा दिवस हिजरी सन एकसष्ठच्या मुहर्रम महिन्याच्या सात तारखेचा होता. सर्वप्रथम शत्रूच्या लष्कराने फ़रात नदीच्या पाण्यावर ताबा मिळवून हुसैन (रज़ि.) यांच्या साठ-सत्तर जणांच्या छोट्याशा काफिल्याचे पाणी बंद केले. दहा तारखेस इतिहासातील हा काळा दिवस उगवला आणि माननीय हुसैन (रज़ि.) यांचे यज़ीदच्या बलाढ्य लष्कराशी युद्ध झाले. त्यांनी आपल्या डोळ्यांनी आपले मुलगे, पुतणे आणि इतर परिवारजनांना यज़ीदच्या क्रूर लष्कराच्या हातून हौतात्म्य पत्करताना पाहिले. शेवटी लढत-लढत माननीय हुसैन (रज़ि.) यांनाही वीरमरण आले. या युद्धामध्ये माननीय हुसैन (रज़ि.) यांचे एक धाकटे चिरंजीव झैबुल आबेदीन (रह.) आणि त्यांच्या परिवारातील स्त्रिया तेवढ्या वाचल्या. बाकी समस्तजणांना वीरमरण आले.

माननीय हुसैन (रज़ि.) हे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या परिवारात असल्याने ज्ञानी व सुशिक्षित होते. प्रेषितांच्या काळात ते खूप लहान असल्यामुळे त्यांच्याकडून प्रेषितांची प्रत्यक्षात आठ वचने कथन करण्यात आलेली असून अप्रत्यक्षपणे कथन करण्यात आलेल्या प्रेषितवचनांची संख्या बरीच मोठी आहे.

माननीय हुसैन (रज़ि.) हे आपल्या पिता अली (रज़ि.) आणि बंधु हुसैन (रज़ि.) व माता फ़ातिमा (रज़ि.) प्रमाणेच न्यायी, सत्यनिष्ठ आणि ईशपरायण होते. सत्यासाठी आपल्या प्राणांची आहुती देऊन त्यांनी आपली सत्यनिष्ठा सिद्ध केली. माननीय हुसैन (रज़ि.) यांना इस्लामचे प्रचंड ज्ञान तर होतेच शिवाय ते एक मोठे विचारवंतसुद्धा होते. ज्ञान व विचारांचा हा वारसा त्यांना आपल्या आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याकडूनच मिळाला होता. आजोबा, आई, वडील आणि ज्येष्ठ बंधुप्रमाणेच ते थोर दानशूरसुद्धा होते. दानधर्माव्यतिरिक्त ते कवि, साहित्यिक आणि कुशल लोकांनासुद्धा सढळ हाताने आर्थिक मदत करीत. लोकांच्या मनात त्यांचा नितांत आदर होता. त्यांच्या प्रवचनात लोक लांब-लांबचा प्रवास करून येत, खूप ध्यान लावून त्यांचे प्रवचन ऐकत. त्यांची संबोधनशैली अत्यंत प्रभावी होती. कमी शब्दांत जास्तीतजास्त

मजकूर देण्याचे कसब त्यांच्या अंगी होते. त्यांचे जीवन अत्यंत साधे आणि स्वभाव खूपच मनमिळाऊ होता. मधुर संभाषणाने ते लोकांवर अत्यंत कौशल्याने मोहिनी टाकीत. त्यांना भेटणारी कोणतीही व्यक्ती त्यांना कधीच विसरत नसे.

एकदा माननीय इमाम हुसैन (रज़ि.) रस्त्याने जात होते. काही दीन-दलित भाकरीचे कोरडे तुकडे पाण्यात भिजवून खात होते. त्यांनी माननीय इमाम हुसैन (रज़ि.)यांना जेवणाचे आमंत्रण दिले. माननीय हुसैन (रज़ि.) यांनी त्यांचे आमंत्रण आनंदाने स्वीकारले. म्हटले की सामान्यजनांच्या जेवणाचे आमंत्रण अवश्य स्वीकारावे, कारण कुरआनात आहे की,

"गर्व करणाऱ्यांना ईश्वर कधीच पसंत करीत नाही."

अर्थातच सामान्यजनांच्या जेवणाचे निमंत्रण न स्वीकारणे हे गर्विष्ठपणाचे वर्तन आहे. मग त्यांनी त्यांच्यासोबत मस्तपैकी जेवण केले आणि त्यांनाही संध्याकाळी आपल्या घरी जेवणाचे निमंत्रण दिले. त्यांच्या याच स्वभावाने त्यांना सर्वसामान्याचे खूप मोठे पाठबळ होते. ते म्हणत,

❖ "कोणत्याही कामात घाई करणे हे मूर्खपणाचे लक्षण आहे.
❖ संयम हे वीराचे सौंदर्य आहे.
❖ परोपकाराची भावना ईश्वराचा मोठा अनुग्रह आहे.
❖ रास्तबाजीमुळे प्रतिष्ठा प्राप्त होते.
❖ खोटारडेपणामुळे अपमान सहन करण्याची नामुष्की पत्करावी लागते.
❖ कंजुषीमुळे दारिद्रय येते.
❖ दानशूरतेमुळे संपत्ती आपल्या पायाच्या दासी होते.
❖ मृदूता हे विवेकतेचे लक्षण आहे.
❖ इतरांची गुपिते आपल्याकडे ठेवी आहेत. ती बाहेर काढू नये.
❖ उच्च नैतिकता ही आराधना आहे.
❖ प्रत्यक्ष कृतीशिवाय अनुभव येत नाही.
❖ इतरांना मदत करणे हेच मैत्रीचे लक्षण आहे.
❖ कोणतेही चांगले कार्य मनापासून करावे.
❖ आपण न केलेल्या कामापासून अपेक्षा ठेवू नये.
❖ याचकाने याचना करून स्वत:चा स्वाभिमान गमावला असला तरी तुम्ही मात्र त्यास रिकाम्या हाती पाठवून आपल स्वाभिमान गमावू नका.

❖ जो आपल्या मानवबंधुस सहकार्य करील, ईश्वर अंतिम निवाड्याच्या दिवशी त्यास मोक्ष देईल.

❖ सर्वांत महान माफीदाता व्यक्ती ती आहे, जी बदला घेण्याचे सामर्थ्य असूनही माफ करते.

❖ स्वत:ची प्रशंसा करणे हे स्वपतनाचे लक्षण होय.

❖ दानधर्मातून पुण्यकार्य करावे.

❖ मार्गभ्रष्टतेतून प्रसिद्धी मिळवू नये.

❖ दानशूर हा नेहमी सरदार आणि कंजुष हा अपमानित होत असतो.

❖ ज्यांच्याकडून काहीही मिळण्याची अपेक्षा नसेल, त्यास सहकार्य करणे ही मोठी दानशूरता होय.

❖ इतरांवर उपकार करणाऱ्यावर ईश्वरही उपकार करतो.

❖ आपल्यावर कोणत्याही प्रकारचा उपचार न केलेल्या व्यक्तीवरही उपकार करणे हा महान उपकार होय.

## ३) माननीय झैनब (रज़ि.) फ़ातिमाची कन्या

ही फ़ातिमाची लाडकी कन्या, नाव झैनब (रज़ि.) आणि उपनाव उम्मे कुलसूम (रज़ि.) होय. हिचा जन्म हिजरी सन पाचच्या 'जमादिल ऊला' या महिन्यात झाला. हिच्या जन्माच्या वेळी प्रेषित मुहम्मद (स.) मदीना शहरात नव्हते. तीन दिवसांनंतर मदीनेस परतल्यावर ते फ़ातिमाच्या घरी आले. नातीस कडेवर घेऊन बराच वेळ ते रडत होते, म्हणू लागले,

''हिचा चेहरा-मोहरा खदीजेसारखाच (प्रेषितांची पहिली स्वर्गवासी भार्या) आहे.''

झैनब (रज़ि.) चे पालनपोषण व शिक्षण-प्रशिक्षण माननीय अली (रज़ि.) आणि फ़ातिमाच्या विशेष देखरेखीत झाले. एकदा चिमुकली झैनब (रज़ि.) कुरआन-पठण करीत होती. पठणात मग्न असलेल्या झैनबला आपल्या डोक्यावरील पदर कधी सरकला, याचे भानच राहिले नाही. आईने (फ़ातिमाने) तिच्या डोक्यावर पदर टाकताना म्हटले,

''बेटा ! ईश्वराची वाणी पठण करताना डोक्यावर पदर असावा.''

एकदा हसन (रज़ि.) आणि झैनब (रज़ि.) हे लहान असताना दोघांत कुरबुर व रुसवाफुगवा झाला. फ़ातिमाने म्हटले,

''मुलांनो ! भांडण केल्याने ईश्वर अप्रसन्न होतो !''

आईची शिकवण ऐकून दोघे घाबरले नि प्रतिज्ञा केली की यापुढे कधीच भांडणार नाही. हसन व हुसैन (रज़ि.) या दोघां भावंडांप्रमाणेच झैनब (रज़ि.) सुद्धा आपले आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांची लाडकी होती. प्रेषितांनी आपल्या जीवनाच्या अंतिम हजच्या प्रसंगी झैनबला सोबत घेतले होते. या वेळी ती अवघ्या पाच वर्षांची होती. हिजरी सन अकरामध्ये प्रेषित आजारी पडले. त्यांच्या निधनाची घटका जवळ येऊन ठेपली होती. त्या वेळी त्यांनी फ़ातिमास मुलांना जवळ आणण्यास सांगितले. फ़ातिमाने आपल्या सगळ्या मुलांना प्रेषितांजवळ बोलावले. आपल्या आजोबांना आजारी पाहून झैनबने त्यांच्या छातीवर डोके ठेवले नि मुसमुसून रडली. प्रेषितांनी आपल्या चिमुकल्या नातीच्या डोक्यावरून हात फिरवून सांत्वन केले.

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निधनाच्या वेळी चिमुकली झैनब (रज़ि.) अवघी सहा वर्षांची होती. आजोबांच्या निधनानंतर अवघ्या सहा महिन्यांनी तिची आई (फ़ातिमा) सुद्धा वारली आणि तिच्या इवल्याशा मनावर दुःखाचा डोंगर कोसळला. आजोबा आणि आईच्या अवघ्या सहा महिन्यांच्या काळातच निधनामुळे माननीय अली (रज़ि.) यांच्या मुलांना अपार दुःख झेलावे लागले. आजोबा नि आई गेल्यावर मात्र अली (रज़ि.) यांनी आपल्या मुलांचे पालनपोषण आणि शिक्षण-प्रशिक्षण स्वतःहून केले. काही काळ लोटल्यावर मुलांच्या व्यवस्थित संगोपानासाठी त्यांनी 'बिन्ते खज़ाम' यांच्याशी विवाह केला.

माननीय अली (रज़ि.) यांच्यासारखा विचारवंत आणि विद्वत्तेचा हाडाचा शिक्षक लाभल्यावर विद्यार्थ्यांचे तर नशीबच चमकले. अली (रज़ि.) यांनी आपल्या शिक्षण कौशल्याचा पुरेपूर वापर करून मुलांना जबरदस्त प्रशिक्षित केले. आपल्याकडील ज्ञान व विद्वत्तेचे पूर्ण खजिने उघडले. झैनबनेसुद्धा इतर भावंडांप्रमाणेच भरभरून शिक्षण घेतले. शिवाय माननीय अली (रज़ि.) यांनी मुलांना केवळ पुस्तकी ज्ञानच नव्हे तर प्रत्यक्षात कृतीशील कार्याचे आपल्या देखरेखीत विशेष प्रशिक्षण दिले. आपल्याकरील दानशूरता, शौर्य, धाडस, संयम, मृदूता, ईशपरायणता, नैतिकता, त्याग, परोपकार, न्याय, सत्यनिष्ठा, गद्य-पद्य साहित्य, संभाषणकौशल्य वगैरे सर्वच उच्च गुणधर्मांचे बाळकडू सर्व मुलांना पाजले. या सर्व गोष्टी आपले आजोबा, आई आणि वडील यांच्याकडून झैनबला पंरपरागत मिळाले. या उच्च गुणधर्मांशिवाय प्रचंड बुद्धिमत्ता, कमालीची इच्छाशक्ती व निर्णयक्षमता, परखड वक्तव्य, शालीनता, ईश्वराराधना वगैरे बाबीसुद्धा झैनबला वारसासंपत्तीप्रमाणेच मिळाल्या. समस्त इतिहासकारांनी या गोष्टीवर सहमती व्यक्ती केली की झैनबसारखी मुलगी त्या काळी समस्त कुरैश परिवारात एकही नव्हती.

झैनबने कुरआनाचा खूप खूप अभ्यास केला होता. आपल्या संभाषणकौशल्याचा ती कुरआन प्रवचन देण्यासाठी पुरेपूर वापर करी. एकदा ती कुरआनाच्या 'सूरह-ए-काफ़-हा-या-ऐन-स्वाद' चे प्रवचन देत होती. इतक्यात माननीय अली (रज़ि.) सुद्धा तेथे आले. आपल्या लाडकीची प्रवचनशैली पाहून खूप प्रभावित झाले. म्हणाले,

''लाडके! मी तुझे प्रवचन ऐकून खूपच प्रभावित झालो. तुझ्या व्याख्यानाने माझा आत्मा प्रसन्न झाला. मला तुझा खूप अभिमान वाटतो की तू ईशवाणी (कुरआन) विषयी इतके प्रभावी व्याख्यान देतेस.''

झैनबने तारुण्याच्या उंबरठ्यावर पाय ठेवला. नि तिला भरपूर स्थळे येऊ लागली. 'अशीश बिन कैस' या गर्भश्रीमंत तरुणाने विवाहाचे निमंत्रण पाठविले. मात्र अली (रज़ि.) यांनी त्यांचा प्रस्ताव स्वीकारला नाही. माननीय अली (रज़ि.) हे कुणाच्या आर्थिक शक्तीने प्रभावित होणारी व्यक्ती मुळीच नव्हती. शिवाय आपल्या लाडक्या मुलीकरिता त्यांना श्रीमंत नव्हे तर एका ईशपरायण तरुणाची गरज होती आणि शेवटी त्यांची ही इच्छा पूर्ण झाली. अब्दुल्लाह बिन जाफर (रज़ि.) हे त्यांचे पुतणे अत्यंत ईशपरायण तरूण होते. अली (रज़ि.) यांनी अब्दुल्लाह बिन जाफर (रज़ि.) यांच्याकडे आपल्या मुलीशी लग्न करण्याचा प्रस्ताव पाठविला. शिवाय अब्दुल्लाह (रज़ि.) हे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या देखरेखीत वाढलेले आणि शिक्षण घेतलेले तरूण होते. त्यांचे वडील माननीय जाफर हे अली (रज़ि.) यांचे सख्खे भाऊ होते. मूताच्या इस्लामी युद्धात आपल्या शौर्याने सर्वांना चकित करून लढत असताना जाफर (रज़ि.) शहीद झाल्याने त्यांचे हे सुपुत्र अब्दुल्लाह (रज़ि.) अनाथ झाले. म्हणून या अनाथ मुलाचे संगोपन व शिक्षण-प्रशिक्षण स्वतः प्रेषितांनीच केले. यामुळे ते अत्यंत ईशपरायण आणि विवेकी तरूण होते. म्हणून असा जावई शोधूनही सापडणार नाही आणि आपली विद्वान व ईशपरायण लेक अब्दुल्लाह (रज़ि.) सोबतच सुखी राहू शकेल याची जाणीव माननीय अली (रज़ि.) यांना नसेल तर नवलच. शेवटी दोघांचा विवाह माननीय अली (रज़ि.) यांनी अगदी साध्या पद्धतीने केला. या काळात माननीय अब्दुल्लाह बिन जाफ़र (रज़ि.) एक प्रतिष्ठित व्यापारी होते नि त्यांच्याकडे संपत्तीची खूप रेलचेल होती.

झैनबचे खाजगी जीवन खूप समाधानी होते. ती आपल्या पतीची मनापासून सेवा करीत असे. पती अब्दुल्लाहसुद्धा तिचा खूप लाड करीत असे. घरात भरपूर नोकर-चाकर असूनसुद्धा झैनब (रज़ि.) स्वतःहून घराचे कामकाज करीत असे. अब्दुल्लाह बिन जाफ़र (रज़ि.) यांना आपल्या या प्रेमळ स्वभावी पत्नीचा खूप अभिमान वाटत असे. ते नेहमी म्हणत,

"बायको असावी तर झैनबसारखी" अब्दुल्लाह (रज़ि.) हे खूप दानशूर, त्यागी स्वभावाचे होते. शिवाय त्यांची बायको झैनबसुद्धा खूप दान-धर्म करणारी. दोघा नवरा-बायकोचा स्वभाव सारखाच असल्याने दोघांत खूप प्रेम असे. दोघेही सढळ हाताने दान-धर्म करीत. एकदा हुसैन (रज़ि.) आपल्या मेहुण्यास अर्थात अब्दुल्लाहस (रज़ि.) म्हणाले, "जरा आवरते घ्या! ज्यांना पैशांची गरज नसते, त्यांनाही तुम्ही देतच राहता!"

यावर अब्दुल्लाह (रज़ि.) म्हणाले,

"अरे बंधु ! ईश्वराने मला यासाठीच ही संपत्ती दिली की मी लोकांमध्ये वाटावी."

घरात संपत्तीची इतकी रेलचेल असूनही दोघा नवरा-बायकोच्या जीवनशैलीत कमालीचा साधेपणा होता. स्वभाव खूप मृदू आणि मनमिळावू व कनवाळू होता. ती आपल्या घरातली कामे आटोपून कुरआन प्रवचन देत असे. तिचे व्याख्यान ऐकण्याकरिता कूफ़ा शहरातील स्त्रियां प्रचंड संख्येत हजेरी लावत असे, यामुळे ती खूप प्रसिद्ध झाली.

हिजरी सन चाळीसमध्ये एका माथेफिरूने खलीफ़ा माननीय अली (रज़ि.) यांच्यावर तीक्ष्ण हत्याराने प्राणघातक हल्ला केला. अली गंभीर झाले नि तिसऱ्या दिवशी हुतात्मा झाले. वडिलांच्या निधनाने ती पार खचून गेली. मात्र अजून तिच्या नशिबी आणखीन बरीच संकटे झेलायची बाकी होती. तिने स्वत:ला कसेबसे सावरले. पित्याच्या मृत्यूच्या जखमा अजून ताज्याच होत्या की हिजरी सन पन्नासमध्ये प्रिय बंधु माननीय हसन (रज़ि.) यांच्या हौतात्म्याचा जीवघेणा घाव हृदयावर सहन करावा लागला. हा घाव भरला नाही तोच माननीय हुसैन (रज़ि.) यांच्या व त्यांच्या समस्त परिवारजनातील तरूणांच्या हौतात्म्याचे अपार दु:ख झेलावे लागले. माननीय हुसैन (रज़ि.) जेव्हा मदीनावरून कूफ़ाकडे निघाले तेव्हा त्यांच्यासोबत समस्त परिवार आणि काही जीवलग मित्र होते. माननीय हुसैन (रज़ि.) यांना कूफ़ावासी इस्लामी शासनाची धुरा सांभाळण्याकरिता वारंवार निमंत्रित करीत होते. म्हणून माननीय हुसैन (रज़ि.) हे आपले समस्त परिवारजन आणि काही जीवलग मित्र मिळून सत्तरजनांचा काफिला घेऊन कूफ़ाकडे रवाना झाले होते. सोबत झैनब (रज़ि.) सुद्धा आपल्या दोनमुलांसोबत होती. तिचे पती माननीय जाफ़र (रज़ि.) मात्र काही कारणास्तव सोबत येऊ शकले नव्हते. एकसष्ठ हिजरी सनाच्या मुहर्रम महिन्यातील दहा तारखेस इतिहासातील काळा दिवस उगवला आणि केवळ स्त्रिया व माननीय हुसैन (रज़ि.) यांचे एक अल्पवयिन सुपुत्र झैनुल आबेदीन (रह.) वगळता यज़ीदच्या लष्कराने सर्वांची निर्दयीपणे हत्या केली. हे सर्वकाही झैनब (रज़ि.) आपल्या डोळ्यांनी पाहात होती. माननीय हुसैन (रज़ि.) शहीद होण्यापूर्वीच्या एका रात्रीपूर्वी आपल्या तलवारीस धार लावीत होते. यज़ीदच्या तीन

हजारांच्या लष्करापुढे कोणाचाही टिकाव लागणार नाही, हे सर्वांनाच माहीत होते. मात्र युद्धभूमीवरून माघार घेण्यासाठी तयार होणे म्हणजे आपली भूमिका बदलण्यासारखे होय. शिवाय सत्यनिष्ठ आणि न्यायी व शूरवीर हुसैन (रज़ि.) व त्यांचे परिवारजन रणांगणातून माघार घेण्याचे पातककर्म करूच शकत नव्हते. सत्य व न्यायाकरिता प्राणाचा बळी देण्याची परंपरा आई-वडील आणि आजोबांकडूनच त्यांच्यात होती. तलवारीस धार लावताना पाहून झैनबला (रज़ि.) रडू कोसळले. म्हणाली,

''बंधु ! तुझ्याविना आता आम्ही कसे जगावे ! तुझ्याऐवजी माझे प्राण जाऊ दे !''

माननीय हुसैन (रज़ि.) यांनी आपल्या बहीणीचे सांत्वन केले. म्हणाले,

''संयम राख ! शूरांना समरभूमीवर धाडतेवेळेस डोळ्यांत अश्रु येऊ देऊ नकोस. मीच नव्हे तर ईश्वराव्यतिरिक्त प्रत्येकजण व प्रत्येक गोष्ट नाशवंत आहे नि केवळ एकटा ईश्वरच अविनाशी आहे. आपण आपले आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या पाऊलखुणांनाच आदर्श मानून त्या मार्गाने जायचे आहे. केवळ त्यांचेच जीवन आपल्यासाठी आदर्श आहे.

हे भगिनी ! तुला ईश्वराची शपथ ! जर मी सत्यमार्गात शहीद झालो तर माझ्या विरहाने विलाप करू नकोस, छाती बडवून घेऊ नकोस.''

बहीणीचे सांत्वन करून आणि तिला संयम व सबुरीची शिकवण देऊन माननीय हुसैन (रज़ि.) युद्धभूमीवर उतरले. हुसैनचे जीवलग मित्र रणभूमीवर शौर्य गाजवित एकेक करून शहीद झाले. यानंतर हुसैनचे सुपुत्र अली अकबर (रह.) शत्रूंच्या रांगा चिरत गेले आणि लढता-लढता शहीद झाले. आपला तरूण पुतण्या शहीद होताना पाहताच झैनब (रज़ि.) स्वतःवर ताबा ठेवू शकली नाही, ती मंडपाच्या बाहेर धावत आली. तिच्या या पुतण्या अली अकबरचा तिला खूप लळा होता, तिने त्याचे खूप लाड पुरविले होते. रक्ताच्या थारोळ्यात अली अकब्रच्या मृत शरीरावर जाऊन पडली, आपल्या छातीशी कवटाळले. मात्र तिच्या हंबरडा फोडण्यापूर्वीच हुसैनने तिचा हात धरून मंडपात पोचविले. मग आपल्या हाताने आपल्या तरूण सुपुत्र अली अकबर (रह.) चे शव रक्ताच्या थारोळ्यातून उचलून मंडपात आणले.

अली अकबरनंतर अब्दुल्लाह बिन मुस्लिम, अहमद बिन हसन, अबू बकर बिन अब्दुल्लाह बिन हसन, जाफर बिन अकील, उमर बिन अली, उस्मान बिन अली आणि इतर तरुण केवळ सातजण सोडून रणभूमी गाजविताना शहीद झाले. यानंतर माननीय हुसैन (रज़ि.) यांची मुले एकेक करून शहीद झाली आणि आता केवळ उरले माननीय हुसैन (रज़ि.) त्यांचे एक सुपुत्र माननीय झैनुल आबेदीन हे आजारी असल्याने लढण्याच्या स्थितीत नव्हते. माननीय हुसैन (रज़ि.) रणांगण गाजवीत होते. ते

शत्रूपक्षावर इतका जबरदस्त हल्ला करीत होते की शत्रूपक्षाच्या रांगा चिरत पुढे जात होते. त्यांच्यासमोर एकटा कोणीही येण्यासाठी धजावत नव्हता. हुसैन (रज़ि.) यांना ठार करण्यासाठी शत्रूचे लष्कर गराडा घालून येत होते, मात्र हुसैनची तलवार चमकताच शत्रूंच्या काळजाचे पाणी होई. आपल्या परिवारजनांच्या एकेक तरुणास शहीद होताना त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिले होते, रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या आपल्या मुलांबाळांच्या किंकाळ्या स्वत: कानाने ऐकून त्यांच्या हौतात्म्याचे दृष्य पाहून त्यांचा प्राण कासावीस होत होता. आता त्यांना जगण्यापेक्षा रणभूमीवरील वीरमरणच जास्त आकर्षक वाटत होते. एखाद्या ढाण्या वाघासारखे ते शत्रूंवर तुटून पडत आणि आपल्या तलवारीची तृष्णा भागवित होते. त्यांच्या एका वारावर शत्रूच्या काळजाचा ठोका पडत होता. लढता लढता त्यांचे शरीर जखमांनी चाळणी झाले होते. तरीसुद्धा शत्रूच्या लष्करातील कोणताही शिपाई त्यांच्यासमोर एकटा येण्यास धजावत नव्हता. शत्रूपक्षाने गराडा घालून चोहोकडून बाणांच्या आणि तलवारींचा जणू वर्षाव केला. 'हिसीन बिन नुमैर' या दळभद्रयाने फेकलेला एक भाला माननीय हुसैन (रज़ि.) यांच्या कंठात शिरला, त्यांच्या मुखावाटे रक्ताच्या गुळण्या बाहेर आल्या, माननीय हुसैन (रज़ि.) यांनी आपल्या कंठातून निघणारे रक्त ओंजळीत घेतले, ते आकाशाकडे फेकून म्हणाले,

"हे न्यायदाता स्वामी ईश्वरा ! तुझ्या लाडक्या प्रेषिताच्या या नातूवर जो काही अन्याय होत आहे, त्याची फिर्याद केवळ तुझ्यासमोरच करीत आहे."

झैनब (रज़ि.) आपल्या लाडक्या भावास हे सर्वकाही करताना पाहत होती, हुसैनला कंठस्नान होताना पाहत होती, ती धावत रणभूमीवर आली आणि यज़ीदच्या लष्कराचा प्रमुख 'उमर बिन साद' यास उद्देशून म्हटले,

"उमर ! अबू अब्दुल्लाह (हुसैन) (रज़ि.) चा वध तुझ्या देखत होत आहे !"

मात्र उमर बिन सादचे मन पाझरले नाही. यज़ीदकडून हुसैन (रज़ि.) यांची हत्या करण्याचे मोठे बक्षीस मिळविण्याच्या लालसेपोटी तो आंधळा झाला होता. तरीसुद्धा तो प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मावस भावाचा दुर्दैवी पुत्र होता. झैनबच्या शब्दांचा थोडा प्रभाव त्याच्या मनावर झाला नि पश्चात्तापामुळे त्याने आपली नजर खाली केली. माननीय हुसैन (रज़ि.) यांचा निष्ठूरपणे वध होताना झैनबने आपल्या डोळ्यांनी पाहिले. शत्रूसैन्याने समस्त शहीदांना घोड्यांच्या टापांनी तुडविले. आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे हुसैनच्या ज्या ललाटाचा प्रेमाने मुका घेत होते, फ़ातिमा (रज़ि.) आपल्या लाडक्या पुत्राच्या ज्या चेहऱ्याचा लाडाने पापा घेत होती, ज्या डोक्यास ममत्वाने कुरवाळत होते, ते शीर एका शत्रूने भाल्यावर उचलले आणि मग तो हुसैनच्या परिवारातील मुली व स्त्रियांकडे वळाला. आजारी आणि अल्पवयीन असलेले हुसैनचे पुत्र झैनुल आबेदीनवर तलवार उगारली, मात्र झैनब (रज़ि.) मध्ये आडवी आली, मोठ्या त्वेषाने म्हणाली,

"शपथ आहे ईश्वराची, या लहानग्यास ठार करण्यापूर्वी तुला माझा जीव घ्यावा लागेल."

झैनबचा उग्र अवतार पाहून तो जागीच थबकला, परत फिरला. बारा तारखेस हुसैन (रज़ि.) यांच्या परिवारातील स्त्रिया आणि मुलींना कैद करून कूफाकडे रवाना करण्यात आले. शहीदांच्या मयत शरीरांकडे पाहून झैनबला राहवले नाही, तिने हंबरडा फोडला, नकळत तिच्या मुखी हे शब्द आले,

"हे मुहम्मद (स.) ! या ! जरा बघा ! तुमच्या लाडक्या सुपुत्राचे रक्त युद्धभूमीवर सांडलेले आहे. त्यांच्या शरीराचे तुकडे तुकडे झाले आहेत, हे मुहम्मद (स.)! आज तुमच्या परिवारातील कन्यांना दोराने बांधून कैद करण्यात आले आहे, हे आजोबा ! आज तुमच्या वंशजांना हाकलून नेण्यात येत आहे. जरा हुसैनला पाहा ! त्यांचे शिर धडावेगळे करण्यात आले आहे."

झैनबचे हे शब्द ऐकून सर्वांच्याच डोळ्यांतून अश्रुधारांचा बांध फुटला होता. हा शोकाकूल आणि दु:खी-कष्टी काफिला कूफ़ा येथे पोचला. आदल्या दिवशी कूफावरून दमास्कसला अर्थात यजीदकडे या काफ़िल्यास रवाना करण्यात आले. यज़ीदने दरबार भरविला, माननीय हुसैन (रज़ि.) यांचे दरबारात सर्वांसमक्ष यज़ीदला दाखविण्यात आले. हुसैनचे शिर पाहून हुसैन परिवारातील सर्वच कैदी स्त्रियांचे दु:ख अनावर झाले, जणू त्यांच्या जखमांवर मीठ चोळण्याचा हा प्रकार होता. हुसैन (रज़ि.) यांचे शिर पाहून झैनब (रज़ि.) म्हणाली,

"हे हुसैन (रज़ि.) ! हे मुहम्मद (स.) यांच्या काळजाच्या तुकड्या ! हे फ़ातिमाच्या लाडक्या सुपुत्रा, हे स्वर्गातील तरुणांचे सरदार !"

तिचे शब्द यज़ीदच्या कानावर घनासारखे आदळत होते. तो पिसाळल्यासारखा झैनबकडे वळाला, दरबारींना विचारले,

"ही महिला कोण आहे?"

"ही हुसैन (रज़ि.) यांची बहीण झैनब (रज़ि.) आहे," एका दरबारीने स्पष्ट केले. यजीद झैनबला उद्देशून म्हणाला,

"तुझा भाऊ म्हणत नव्हता काय की तो खिलाफतसाठी माझ्याहून जास्त योग्य आहे?"

"होय ! निश्चितच म्हणत होता !" झैनब (रज़ि.) निर्भयपणे उत्तरली.

"मात्र ईश्वराने शासन माझ्या हाती दिले, विजय माझ्या पारड्यात पडला." यजीद कुत्सितपणे म्हणाला.

यावर झैनबने समस्त दरबारीसमक्ष अत्यंत त्वेषाने उद्देशून म्हटले,

"हे यज़ीद ! आज मला तुझ्यासमोर नाविलाजाने बोलावे लागते. याद राख, ईश्वर आम्हास जास्त दिवस या परिस्थितीत ठेवणार नाही. आमची उद्दिष्टे नष्ट होणार नाहीत. तू आमचे नुकसान केलेले नसून स्वत:च्याच पायावर कुऱ्हाड मारून घेतली. तुझ्या लोकांनी प्रेषितांच्या कडेवर खेळलेल्या त्यांच्या लाडक्या नातूचा (हुसैनचा) आणि त्यांचे भाऊ, मुले आणि त्यांच्या जीवलग सहकाऱ्यांचा हकनाक अमानुष वध केला. प्रेषितांच्या परिवारजन स्त्रियांना अपार दु:ख पोचविले, कर्बलाच्या स्थळी झालेल्या हौतात्म्यांना तू पाहिले असते तर तुझा पूर्ण गर्व उतरला असता, तू आपली संपूर्ण प्रतिष्ठा त्यांच्यावर ओवाळून टाकली असती आणि त्यांच्या चरणी उभे राहणे पसंत केले असते. लवकरच आम्ही आपले आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यासमोर हजर होणार आणि तुझ्या निष्ठूर व पाषाणहृदयी लोकांच्या अमानुष अत्याचारांचे शोकांतिका सांगणार. शहीदांच्या शरीराचे रक्त आणि रणभूमीची धूळमाती त्याप्रसंगी साफ करण्यात येईल. तेथे अत्याचारींकडून या अत्याचाराचा पूर्णत: बदला घेण्यात येईल. हुसैन (रज़ि.) आणि त्यांचे साथीदार मेले नाहीत, ते आपल्या निर्मात्या प्रभु ईश्वराकडे जीवंत असून तेथेच ते सुखी आहेत. तो प्रभु सच्चे न्यायनिष्ठ प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या वंशजांच्या खुन्यांकडून अवश्य बदला घेईल. त्याच ईश्वरदरबारी आम्ही दयेची व न्यायाची याचना करतो."

झैनबचे हे धाडसी व सडेतोड भाषण ऐकून यज़ीद व त्यांचे दरबारी अवाक झाले. काय बोलावे ते त्यांना सुचेनासे झाले. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या वंशजांच्या सहानुभूतीची लाट जर उठली आणि शहीदांच्या सहानुभूतीचे जनतेत वादळ उठले तर आपले शासन वाहून जाईल. या भीतीने त्याच्या मनाचा थरकाप उडाला. म्हणून त्याने झैनब (रज़ि.) आणि तिच्या सोबतच्या अन्यायग्रस्तांची समजूत काढण्याचा प्रयत्न केला, त्यांना आपल्या विशेष कक्षात थांबविले, त्यांचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. काही दिवसांनंतर माननीय 'नुअमान बिन बशीर अनसारी (रज़ि.)' यांच्या देखरेखीत त्यांना मदीना शहरी रवाना केले. प्रवास खूप लांबचा होता. झैनब (रज़ि.) आणि तिच्या सोबत असलेल्या स्त्रियांचा हा अन्यायपीडित काफ़िला जेव्हा मदीनेकडे रवाना झाला तेव्हा झैनब (रज़ि.) दु:खद स्वरात म्हणाली,

"आम्हा सर्वांवर काळ्या चादरी टाका. पाहणाऱ्यांनाही वाटेल की या स्त्रिया फ़ातिमाच्या परिवारजनी आहेत."

माननीय नुअमान (रज़ि.) यांनी प्रवासात या काफ़िल्याची खूप सेवा केली, कोणत्याही प्रकारचा त्रास न होऊ देण्याची पूर्णपणे खबरदारी बाळगली. हा काफ़िला जेव्हा कर्बलाच्या मैदानावर पोचला, तेव्हा तेथे माननीय जाबिर बिन अब्दुल्लाह (रज़ि.)

आणि हाशिम परिवाराचे (अर्थात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या परिवाराचे) काहीजन पोचले होते. हा अन्यापीडित काफिला पाहताच त्यांना रडू आवरले नाही. हा काफिला जेव्हा मदीना शहरी पोचला तेव्हा सूर्य मावळत होता. फ़ातिमाची ही स्वाभिमानी कन्या झैनब (रज़ि.) आपल्या हातातील बांगड्या काढून माननीय नुअमान बिन बशीर (रज़ि.) यांना त्यांच्या समोर करून म्हणाली,

"तुम्ही आमची खूप सेवा केली, म्हणून तुम्हास देण्यासाठी या बांगड्यांशिवाय आज माझ्याजवळ काहीही नाही?"

तिचे शब्द ऐकताच माननीय नुअमान (रज़ि.) यांना गहिवरून आले, त्यांच्या डोळ्यांतून अश्रुंच्या धारा वाहू लागल्या, थरथरल्या आवाजात ते म्हणाले,

"हे प्रेषितांच्या लाडक्या नाती ! शपथ ईश्वराची ! मी तुम्हा सर्वांकरिता जे काही केले, ते केवळ ईश्वराच्या प्रसन्नतेखातरच केले, तुझ्या या बांगड्या तुलाच ठेव !"

या दिवशी संपूर्ण मदीना शहर दु:खसागरात बुडाले होते. हजारो लोक संकटपीडित झैनब (रज़ि.) आणि तिच्या सोबत असलेल्या प्रेषित वंशजांच्या सांत्वनासाठी येत होते. झैनब (रज़ि.) आपले आजोबा प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कबरीवर हजर झाली. आपल्या भाऊ हुसैन (रज़ि.) आणि इतर भावंडे, नातलग व सोबत्यांच्या हौतात्म्यावर रडण्याची अद्याप तिला खुलून संधीच मिळाली नव्हती. आता मात्र तिच्या हृदयाचा बांध फुटला. तिच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहू लागले आणि मुखावाटे हे शब्द बाहेर पडले,

"माझ्या आजोबा ! मी तुमच्या नातूची, माझ्या भावाची खबर घेऊन आले. त्याने न्याय व सत्यासाठी आपल्या प्राणाचा बळी दिला. तुमच्या वंशजांना (आम्हाला) दोरीने बांधून कूफा आणि दमास्कसच्या रस्त्यावरून फिरविण्यात आले. आमचा अपमान करण्यात आला !"

झैनबचे विव्हळणे ऐकून सोबत असलेल्या प्रचंड जमावतील प्रत्येकजण रडू लागला. मग ती आपली आई फ़ातिमाच्या कबरीवर हजर झाली आणि इतक्या आवर्तपणे टाहो फोडला की पाषाणांनाही पाझर फुटावा. तेथून निघाल्यावर ती आपल्या परिवारजनांच्या इतर लोकांना भेटली नि त्यांना सविस्तर हकीकत सांगून संयम आणि धीर धरण्याचा सल्ला दिला.

असंख्य संकटे आणि दु:खांना झेलल्याने झैनब पूर्णत: खचून गेली होती. मदीना शहरी आल्यावर काही काळातच अर्थात हिजरी सन बासष्टमध्ये तिने आपले प्राण सोडले. प्रेषितवंशातील इतर काहींची ही एकुलती एक पालक असलेली झैनब (रज़ि.) त्या सर्वांना अनाथ करून गेली.

## ४) माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.) फ़ातिमाची धाकटी कन्या

माननीय उम्मे कुलसूम (रज़ि.) ही फ़ातिमाची धाकटी कन्या असल्याने ती सुगरा (अर्थात लहान) या नावानेही संबोधली जाते. उम्मे कुलसूमचा पहिला विवाह खलीफ़ा माननीय उमर (रज़ि.) यांच्याशी झाला. (संदर्भ : अलफारुक लेखक : शिबली नुअमानी)

माननीय खलीफ़ा उमर (रज़ि.) यांच्या मनात एकदा असा विचार आला की, प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या परिवाराशी आपले नाते प्रस्थापित व्हावे. हे आपल्याकरिता पुण्यप्रतिष्ठा सिद्ध होईल. त्यामुळे त्यांनी माननीय अली (रज़ि.) यांच्याकडे उम्मेकुलसूमशी विवाह-प्रस्ताव पाठविला. उम्मे कुलसूम (रज़ि.) अद्याप लहान असल्याने अली (रज़ि.) यांनी सुरुवातीस नकार दिला. मात्र खलीफ़ा उमर (रज़ि.) यांनी त्यांना विनंती करून म्हटले की, प्रेषितांच्या परिवाराशी नाते स्थापन करून पुण्य मिळविण्याकरिता तुमच्या मुलीशी विवाह करण्याचा माझा हेतू आहे. म्हणून माननीय अली (रज़ि.) यांनी त्यांचा प्रस्ताव स्वीकारला आणि हिजरी सन सतरामध्ये चाळीस हजारच्या मेहेर (वधूभेटीची रक्कम) वर दोघांचा विवाह झाला.

(संदर्भ : बुखारी, बाबुल जिहाद, पृष्ठ - २०३)

माननीय उमर (रज़ि.) यांच्याशी विवाह झाल्यावर त्यांना मुलगा झाला. या मुलाचे नाव 'झैद' असे ठेवण्यात आले. मात्र जन्माच्या काही काळानंतरच हा मुलगा मरण पावला. माननीय उमर (रज़ि.) शहीद झाल्यावरही ती बराच काळ जीवंत होती. यानंतर तिचा विवाह माननीय ऊन बिन जाफ़र (रज़ि.) यांच्याशी झाला. यांच्याकडून त्यांना कोणतेही मूलबाळ झाले नाही. यानंतर 'ऊन बिन जाफ़र (रज़ि.)' मृत्यू पावले. त्यांच्या मृत्यूनंतर मुहम्मद बिन जाफ़र (रज़ि.) यांच्याशी तिचा विवाह झाला. त्यांच्यापासून त्यांना एक मुलगी झाली, मात्र तीसुद्धा बालपणातच मरण पावली.

## ५) माननीय फ़िझ्झा (रज़ि.) फ़ातिमाची सेविका

फ़िझ्झा (रज़ि.) ही फ़ातिमाची सेविका होती. तिने जीवनभर प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या परिवारजनांची खूप मनापासून सेवा करण्याचे अपार पुण्य मिळविले. ती ॲबेसीनियाची रहिवासी होती. तिने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या हातावर इस्लाम स्वीकारला होता. फ़िझ्झा (रज़ि.) ही केवळ घरातील कामेच करीत, असे नव्हे तर ती फ़ातिमाच्या प्रत्येक सुख-दु:खात सहभागी असे. यामुळे फ़ातिमाने तिला ती सेविका असल्याची कधीच जाणीव होऊ दिली नाही. ती अगदी घरच्या इतर सदस्याप्रमाणेच होती. फ़ातिमाचे निधन झाले तेव्हा तिला अंतिम स्नान देतेवेळेस फ़िझ्झाही हजर होती. फ़ातिमाचा डोलारा उठतेवेळेस माननीय अली (रज़ि.) यांनी घरच्यांना बोलावताना अशी हाक दिली,

"हे उम्मे कुलसूम (रज़ि.), हे फ़िइझा (रज़ि.), हे हसन (रज़ि.), हे हुसैन (रज़ि.) ! या ! आपल्या आईचे अंतिम दर्शन करा. आता ती तुम्हास सोडून जात आहे. यानंतर स्वर्गातच तिची तुमच्याशी भेट होईल !"

फ़ातिमाच्या निधनानंतर फ़िइझाने झैनब (रज़ि.) ची सेवा केली. कर्बलाच्या संकटसमयी ती झैनबसोबतच होती. झैनबच्या निधनाच्या काही काळानंतर तिनेही या इहलोकाचा त्याग केला.

## प्रकरण अठ्ठाविसावे

# स्त्री-रक्षणाची इस्लामी सूत्रे

१) परपुरुषांसमोर आपल्या सौंदर्याचे प्रदर्शन स्त्रियांनी करू नये.

२) आपल्या पायातील अथवा शरीरावरील दागिन्यांचा आवाजही परपुरुषांच्या कानावर जाऊ नये, याची खबरदारी घ्यावी.

३) अत्तर वा सुगंधित द्रव्याचा वापर करून घराबाहेर पडू नये.

४) परपुरुषांशी बोलताना आपल्या संभाषणशैलीत नाजुकता असू नये.

५) परपुरुषांशी बोलताना आणि रस्त्याने चलताना आपली दृष्टी खाली ठेवावी.

६) पुरुषांच्या जमावाठिकाणी जाण्याचे सहसा टाळावे.

७) शक्यतो रस्त्याच्या एका बाजूने चालावे.

८) ज्या ठिकाणी धक्के-बुक्के लागण्याची शक्यता असेल, अशा गर्दीच्या ठिकाणी जाण्याचे टाळावे.

९) घरून बाहेर पडल्यावर चालताना लटकत-मटकत चालू नये.

१०) आपल्या पतीसमोर एखाद्या इतर स्त्रीच्या सौंदर्याची अथवा कौशल्याची वाखाणणी करू नये.

११) परपुरुषांसोबत प्रवास करू नये. अगदी हजसारख्या पुण्यकर्मासाठीही नाही.

१२) आपल्या शालीनतेचे नेहमी रक्षण करावे.

✻ समाप्त ✻